

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







वर्ष ३३ । अंक ३ ।
पावसाळा (जुलै) २०१४
विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
(Refereed Journal)

भाषा आणि जीवन
मराठी अभ्यास परिषद पत्रिका

ईश्वरराव पुरुषोत्तमराव प्रकरणाबद्दल सविस्तर
आणि उद्याच्या आत ह्याच संध्याकाळी बोलायची दोघांना
घाई होती. तूर्त घाई आवरून धरून स्वतःला सुटं ठेवता
येईल, असं आत्मारामला आलं होतं. घाई उकरून काढून
पार होता येईल, असं सुखदेवला आलं होतं. शरीरात
रक्त असतं तसं दोघांच्यात घाई होती.

घाई आवरायची घाई करत आत्मारामनं घाईत
तेल घेऊन टाकलं.

तेव्हा दोन्ही बापांनी पोरांना उचलून हातांच्या
कोनाड्यात घेतलं होतं. आत्मारामनं पोराला उजव्या
हातावरनं डाव्या हातावर घेतलं. उजव्या हातात तेलाची
बुधली स्थिर धरली. सुखदेवनं पोराला उजव्या हातावर
धरलं होतं. आत्मारामचं पोरगं जवळ आलं तसं सुखदेव-
-च्या पोरानं उत्साहानं आत्मारामच्या पोराला स्पर्श केला
ते नाकात बोट गेलं; आत्मारामच्या पोरानं आत्मारा-
-मच्या हातावर गच्चदिशी उसळी घेतली, आत्माराम चालता-
-चालता थोडासा अस्थिर झाला, बुधली हिंदकळून तेल
सांडतंय का काय अशी चिंता आली. स्पर्श करताना अर्धं
नाकात बोट जाताना सुखदेवचं पोरही पुढं झुकलं होतं,
त्यामुळे सुखदेवही थोडासा अस्थिरला होता.

श्याम मनोहर
23 ऑगस्ट 2014

हे ईश्वरराव... हे पुरुषोत्तमराव

**संपादक :** प्र॰ना॰ परांजपे
**संपादन-समिती :** प्र॰ना॰ परांजपे (प्रमुख), विजय पाध्ये, आनन्द काटीकर, सरोजा भाटे, सलील वाघ, विजया चौधरी.
**लेख पाठविण्यासाठी आणि संपादकीय पत्रव्यवहारासाठी :** प्र॰ना॰ परांजपे, एच् - 1, क्लॅरियन पार्क, औंध टेलिफोन एक्स्चेंजजवळ, पुणे 411 007.
चलभाष : 09422509638 ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनन्द काटीकर, बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411 051.
चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष :(020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 095459 50808 **विजय पाध्ये** - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** -

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| **संस्था :** | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/-+ नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र॰ 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹२,५००/-, अर्धे पान ₹१,५००/-, पाव पान ₹८००/ शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन :** त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

## अनुक्रमणिका



## विद्वत्प्रमाणित

'भाषा आणि जीवन' ('मराठी अभ्यास परिषद पत्रिका') हे त्रैमासिक 'refereed' आहे; म्हणजे त्या विषयांतील विद्वानांनी वाचून संमत केलेले लेख या त्रैमासिकात प्रसिद्ध केले जातात. 'refereed' या इंग्रजी संज्ञेला समाधानकारक व सर्वसंमत असा प्रतिशब्द सिद्ध होईपर्यंत 'विद्वत्प्रमाणित' किंवा 'विद्वत्संमत' हे शब्द वापरण्याचे आम्ही ठरविले आहे.

## आदरांजली

१ ) **राम पटवर्धन :** 'मौज' प्रकाशन व 'सत्यकथा' मासिकाचे संपादकपद भूषविणारे, अनेक लेखकांना घडविणारे आणि १९६० ते ८० (व त्यानंतरच्या) दशकांतील अभिरुचीवर आपला ठसा उमटविणारे राम पटवर्धन अलीकडेच कालवश झाले. संपादकाप्रमाणेच ते उत्तम अनुवादकही होते. मार्जरी किनन रॉलिंग या अमेरिकी लेखिकेच्या 'दि यर्लिंग' या कादंबरीचा त्यांनी केलेला 'पाडस' हा अनुवाद तरुण वाचकांनी पुन:पुन्हा वाचला. (त्यामुळे त्याच्या आत्तापर्यंत तीन आवृत्त्या प्रकाशित झाल्या.) अय्यंगार यांच्या 'द लाइट ऑन योग' या ग्रंथाचे भाषांतर करताना त्यांनी त्यातील योगासने तेथे दिलेल्या क्रमाने दोन वर्षे स्वत: करून पाहिली. ते विनोबांचे अनुयायी होते. साहित्याप्रमाणेच संगीत, रंगचित्र, नाटक इ० ललितकला व तमाशासारख्या लोककलेतही त्यांना विलक्षण रस होता. सत्यकथेच्या अंतिम टप्प्यात त्यांनी सुरू केलेले 'प्रदक्षिणा' हे सदर महाराष्ट्राच्या समकालीन सांस्कृतिक जीवनाचा दस्तावेज होता.

२ ) **यू०आर० अनंतमूर्ती :** सुप्रसिद्ध कन्नड लेखक यू० आर० अनंतमूर्ती अलीकडेच कालवश झाले. 'संस्कार' या कादंबरीने समकालीन कन्नड वाङ्मयात खळबळ माजवली. त्यांना ज्ञानपीठ पुरस्काराने सन्मानित करण्यात आले होते. मैसूर विद्यापीठात त्यांनी इंग्रजीचे अध्यापन केले. केरळमधील गांधी विद्यापीठाचे कुलगुरू, साहित्य अकादमीचे अध्यक्ष इ० अनेक पदे त्यांनी भूषविली.

३ ) **राजाभाऊ माटे :** प्रकाशक, मुद्रक, वृद्धकल्याण क्षेत्रातील कार्यकर्ते अशा अनेक क्षेत्रांत भरीव कामगिरी करणारे राजाभाऊ माटे यांचे अलिकडेच निधन झाले. स्काउट व राष्ट्रदलाच्या संस्कारांमुळे राजाभाऊंनी पन्नाशीनंतर प्रकाशन व्यवसाय बंद करून केवळ समाजसेवा केली. 'अनाथ-पंगु-गृहा'चे त्यांनी 'निवारा' असे नामांतर केले. वृक्षारोपण, सभागृह, व्यायाम शाळा इ०ची जोड देऊन उदास व निराश वृद्धाश्रमात त्यांनी चैतन्य, आनंद व खेळकरपणा यांचे वारे खेळवले.

४ ) **मा० ना० आचार्य :** मराठीचे निवृत्त प्राध्यापक, 'भाषा आणि जीवन'चे एक लेखक, मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सभासद, व्याकरणतज्ज्ञ, प्राचीन व मध्ययुगीन साहित्याचे अभ्यासक व अनेक पुस्तकांचे लेखक.

५ ) **रामदास डांगे :** मराठीचे निवृत्त प्राध्यापक, प्राचीन व मध्ययुगीन साहित्याचे अभ्यासक, म०रा० साहित्य संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेल्या मराठी शब्दकोशाचे संपादक.

६ ) **जयवंत चुनेकर :** मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सभासद. अनेक पुस्तकांचे संपादक. 'माय मराठी १' या संचाचे एक लेखक.

# भाषा-साहित्य-संस्कृती यांचा सखोल अभ्यासक - डॉ० अशोक रा० केळकर

- आनन्द काटीकर

डॉ० अशोक रामचंद्र केळकर, हे नाव आणि भाषाविज्ञान यांची सांगड सर्वांच्या मनात आहे. त्यामुळे केळकर केवळ भाषेच्या क्षेत्रातच कार्यरत होते, असा अनेकांचा समज आहे. मात्र भाषा ही समाज आणि संस्कृती यांचा अविभाज्य भाग असते, हे केळकरांनी अचूकपणे जाणले होते. त्यामुळे त्यांचे वर्णन करताना, केवळ भाषावैज्ञानिक असे न म्हणता, साहित्याचा जाणकार समीक्षक आणि संस्कृतीचा सखोल अभ्यासक असे त्यांचे वर्णन योग्य ठरेल.

अशोक केळकर यांचे शालेय शिक्षण पुण्यातील रमणबागेतील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. पुढे फर्ग्युसन महाविद्यालयातून त्यांनी इंग्लिश व फ्रेंच या विषयांत १९५३ मध्ये एम०ए० पदवी प्राप्त केली. व्याकरणाची आवड आणि भाषिक प्रश्नां-बद्दलच्या कुतूहलामुळे ते भाषाविज्ञानाच्या अभ्यासाकडे वळले. रॉकफेलर आणि लिली या प्रतिष्ठानांतर्फे भाषाविज्ञान आणि मानववंशशास्त्र यांच्या अभ्यासासाठी त्यांना छात्रवृत्तीही मिळाली. (१९५६-५८) अमेरिकेतील कॉर्नेल विद्यापीठात सुप्रसिद्ध भाषा-वैज्ञानिक चार्ल्स हॉकेट यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी 'दि फोनॉलॉजि अँड मॉर्‌फॉलॉजि ऑफ मराठी' या विषयावर प्रबंध लिहिला आणि पीएच.डी. प्राप्त केली. प्रथम त्यांनी आग्रा विद्यापीठात १९५३-५६ व १९५८-६२ या कालावधीत इंग्रजी व भाषाविज्ञानाचे अध्यापन केले. १९६२-६७ दरम्यान ते पुणे विद्यापीठात प्रपाठक होते. १९६७-८९ दरम्यान, म्हणजे निवृत्तीपर्यंत ते पुण्यातील डेक्कन कॉलेजमध्ये भाषाविज्ञानाचे प्राध्यापक होते. तेथील 'सेंटर फॉर ॲडव्हान्स्ड स्टडीज इन लिंग्विस्टिक्स'चे ते संचालकही होते.

जगातील विविध देशांमध्ये झालेल्या भाषाविषयक चर्चासत्रांमध्ये अशोक केळकर सहभागी होत असत. त्यांनी भाषेशी संबंधित विविध क्षेत्रांचा - भाषेचा शास्त्रीय अभ्यास, भाषिक समस्या, भाषा आणि सांकेतिक सिद्धान्त, साहित्य आणि कलेतील समस्या, साहित्यसिद्धान्त, चिन्हशास्त्र व भाषेचे तत्त्वज्ञान यांचा सखोल अभ्यास करून लिखाण केले. मराठी भाषेचा आर्थिक संसार (१९७८), प्राचीन भारतीय

साहित्यमीमांसा (१९७९), वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार (१९८३), कवितेचे अध्यापन, भेदविलोपन : एक आकलन (१९९५), मध्यमा : भाषा आणि भाषाव्यवहार (१९९६), रुजुवात (२०१०, साहित्य अकादमी पुरस्कार) ही त्यांची मराठीतील, 'त्रिवेणी' हे हिंदीतील आणि 'फोनिमिक अँड मॉर्फिमिक फ्रीक्वन्सी इन ओरिया आणि 'लँग्विज इन अ सेमिऑटिक पर्स्पेक्टिव्ह : दि आर्किटेक्चर ऑफ अ मराठी सेन्टेन्स' ही इंग्रजीतील पुस्तके याची साक्ष पटवतात. त्याचप्रमाणे १५०हून अधिक संशोधनलेख, मुलाखती यांतून मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषांत त्यांनी लिखाण केलेले आढळते. त्यांच्या लेखनातील मौलिकता लक्षात घेऊन हिंदी, कन्नड, बंगाली, रशियन, फ्रेंच, कोंकणी, ओरिया आणि गुजराती यांसारख्या भारतीय व परकीय भाषांत त्यांच्या लेखनाचे भाषांतर झाले आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषद, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया, नृत्यभारती कथ्थक नृत्य अकादमी (पुणे), सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंग्लिश ॲन्ड फॉरिन लँग्वेजिज्, मराठी अभ्यास परिषद, राज्य मराठी विकास संस्था अशा विविध संस्थांमध्ये तज्ज्ञ म्हणून किंवा पदाधिकारी म्हणून ते कार्यरत होते. भारत, कॅनडा, फ्रान्स, इराण आणि रशियातील विविध विद्यापीठे, शैक्षणिक संस्था आणि सरकारी संस्थांसाठी त्यांनी सल्लागार म्हणून भूमिका बजावली. विविध शैक्षणिक अहवाल तयार करताना, सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ जे० पी० नाईक यांना अशोक केळकरांची खूपच मदत झाली होती. त्यांना २००२मध्ये भारत सरकारने पद्मश्री पुरस्काराने सन्मानित केले होते.

भाषेचा उपयोग मानवी संस्कृतीच्या इतिहासात हजारो वर्षे होत आला आहे. संज्ञापन, भावनांचे प्रकटीकरण, सत्तास्थापना, सामाजिक स्थान इत्यादी कारणांसाठी भाषेचा वापर केला जातो. त्यामुळे भाषेकडे पाहण्याचे विविध दृष्टिकोनही समाजात विद्यमान आहेत. केळकरांनी अशा सर्व विचारांचा परामर्श तर घेतलाच; पण त्यांतील स्थळ-काळ-परिस्थितीनुसार बदलणाऱ्या भूमिकाही लक्षात घेतल्या. त्यामुळेच त्यांच्या भाषिक विचारांत खऱ्या अर्थाने समन्वयाची भूमिका दिसते. भाषेकडे भावनिक दृष्टीने पाहणाऱ्यांची संख्या समाजात कायमच जास्त असते. त्यात मानसशास्त्रीय किंवा सामाजिक दृष्ट्या काहीही चूक नाही, हे त्यांना मान्य होते; पण त्यामुळे आपली ज्ञानाधिष्ठित भूमिका त्यांनी बदलली नाही. उलट शिक्षण मातृभाषेत होणे जास्त उपयुक्त असते, असे सांगतानाच उत्तम इंग्रजी येण्यासाठी शिक्षणाचे माध्यम बदलण्याऐवजी, इंग्रजी उत्तम शिकवणाऱ्या अध्यापकांची गरज त्यांनी अधोरेखित केली. म्हणजेच केवळ भावनेच्या लाटेवर स्वार होणाऱ्या मराठीप्रेमी मंडळींना त्यांनी बुद्धिनिष्ठ विचार करायला शिकवले. भाषेकडे वैज्ञानिक दृष्टीने पाहण्याची सवय मराठी भाषकांना लागावी. याकरता त्यांनी सतत प्रयत्न केले. राज्य मराठी विकास संस्थेचा आराखडा





अनुक्रमणिका

त्यासाठीच तयार केला. सरकार अशी संस्था निर्माण करण्यास उत्सुक नाही, हे लक्षात आल्यावर मराठी अभ्यास परिषदेची स्थापना होण्यासाठी प्र० ना० परांजपे आणि मॅक्सिन बर्नसन यांना सहकार्य केले. या संस्थेचे ते संस्थापक-अध्यक्ष तर झालेच; पण पुढे जवळपास २५ वर्षे संस्थेचे अध्यक्ष राहिले. संस्थेचे त्रैमासिक 'भाषा आणि जीवन'चे त्यांनी पहिली सहा वर्षे संपादन केले व या नियतकालिकाला दर्जेदार भाषाविषयक नियतकालिक म्हणून नावलौकिक मिळवून दिला. भारतातील यशस्वी भाषाविषयक नियतकालिकाचे एकमेव उदाहरण म्हणून आज 'भाषा आणि जीवन' ओळखले जाते, ते केळकरांच्या व्यासंगी आणि साक्षेपी संपादनामुळेच.

'भाषा आणि जीवन' या नियतकालिकातून केळकरांनी भाषेसंदर्भात विविधांगी लेखन केले आणि करवून घेतले. एक संपादक म्हणून त्यांनी अनेक लेखक जसे घडवले तसेच वाचकांनाही घडवले. महाराष्ट्रात भाषाविज्ञानाचा अभ्यासक्रम विविध विद्यापीठांत शिकवायला सुरुवात झाल्यानंतर, या नव्या विषयाच्या अध्यापनासाठी अध्ययन-सामग्री निर्माण करण्यात 'भाषा आणि जीवन'चे योगदान लक्षणीय आहे. हे योगदान प्रामुख्याने अशोक केळकरांनीच दिलेले आहे. उदाहरणादाखल सांगायचे तर; १८३२ मध्ये सुरू झालेल्या 'दर्पण'पासून १९८३मध्ये 'भाषा आणि जीवन सुरू होईपर्यंत विविध मराठी दैनिके-साप्ताहिके-पाक्षिके-मासिके-वार्षिके यांतून भाषेच्या १८ अंगांवरच लेखन झालेले होते. अशोक केळकरांनी 'भाषा आणि जीवन'च्या तिसऱ्या वर्षातच साधारणपणे ६० भाषिक विषयांवर लेखन करण्याचे आवाहन नव्या वाचक-लेखकांना केले होते आणि मुख्य म्हणजे पहिल्या १० वर्षांत जवळपास ४८ भाषिक विषयांवर 'भाषा आणि जीवन'ने काही ना काही लेखन प्रसिद्ध केलेले आढळते. अशोक केळकर हे केवळ अभ्यासक नव्हते तर ते द्रष्टे विचारवंत होते, हेच या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होते.

भाषाविज्ञानात होणारा भाषेचा अभ्यास म्हणजे भाषाप्रयोगांचा किंवा भाषाप्रभुत्वाचा अभ्यास नसून त्या भाषिक समूहाला कवेत घेणारी जी व्यवस्था असते, त्या व्यवस्थेचा अभ्यास होय, हे सर्वांच्या गळी उतरवण्यासाठी केळकरांना खूपच कष्ट घ्यावे लागले. त्यामुळेच एका बाजूला केळकरांनी सोस्यूर, सपीर, याकोबसन, चॉम्स्की इत्यादी भाषावैज्ञानिकांच्या विचारांचा परिचय मराठी भाषकांना कसा होईल, याकडे लक्ष दिले तर दुसऱ्या बाजूला अवतीभोवतीच्या भाषिक प्रश्नांनाही उत्तरे शोधण्याचे प्रयत्न केले.

सामान्यत: अभ्यासक आपल्या विद्यापीठीय किंवा शैक्षणिक चौकटीत स्वत:ला बंदिस्त करून घेतात. त्यामुळे सामाजिक समस्यांवर त्यांनी सुचवलेले उपाय अंमलबजावणीसाठी नसतात, अशी सामाजिक परिस्थिती आहे. केळकर याबाबतीत

मात्र एकदमच वेगळे होते. भाषा, साहित्य आणि संस्कृती यांचा परस्परसंबंध अचूक ज्ञात असल्याने त्यांनी शासनाने आणि समाजाने नेमके काय करायला हवे, यावर सर्व बाजूंनी प्रकाश टाकला आहे. त्यातूनच त्यांनी केलेले 'भारताचे भाषिक प्रश्न', 'राजभाषा मराठीचा वाद', 'परिभाषेची परिभाषा', 'आदिवासींच्या प्रश्नांची भाषिक बाजू', 'भाषेचे नियोजन', लिपी आणि लेखनव्यवस्था' इत्यादी विषयांवरील लेखन याची साक्ष देते. भारतातील बहुभाषिकतेचा प्रश्न पूर्वीच्या पिढीने अनौपचारिक पद्धतीने सोडवला होता, त्यामुळे आपणही जुन्या-नव्या युगांचा संयोग करून तो प्रश्न सोडवू शकतो, अशी भूमिका त्यांनी घेतली, ती त्यांच्या सखोल सामाजिक अभ्यासाचेच निदर्शक होती. आचार्य अत्रे यांनी महाराष्ट्र शासनाच्या पदनाम कोशावर परखड टीका केली. त्यामुळे मराठी राजभाषा होण्याची प्रक्रिया विस्कळीत झाली. केळकरांनी या विषयात परिभाषेची आवश्यकता ठामपणे मांडली; पण त्याचबरोबर अन्यत्र वापरण्याजोगी भाषा - मुख्यत: वाक्यरचना सोपी आणि सुटसुटीत असायला हवी, हे सोदाहरण स्पष्ट केले. तसे करू शकणाऱ्या अभ्यासकांना प्रोत्साहन दिले. त्यामुळेच पुढे गीता भागवत, सत्त्वशीला सामंत आदींनी सोप्या मराठीसाठी प्रयत्न केलेले दिसतात.

भाषावैज्ञानिक म्हणजे व्याकरणाला विरोध करणारा, अशी केळकरांची प्रतिमा कधीही बनली नाही कारण व्याकरणाने आजवर भाषिक समज वाढवण्याचे काम केलेले आहे, यावर त्यांचा विश्वास होता. उलट आधुनिक भाषाविज्ञानाच्या दृष्टिकोनातून व्याकरणाचे पुनर्लेखन कसे करता येईल, याकडेही त्यांनी लक्ष दिले. त्यामुळेच 'मराठी व्याकरणाची नवी दिशा' या लेखातून त्यांनी स्वनव्यवस्था, शब्दसिद्धी, प्रयोगव्यवस्था आणि वाक्यरचना या विषयांतील नवा विचार आपले व्याकरण किती सखोल करू शकतो, याची जाणीव अभ्यासकांना करून दिली. त्याचबरोबर देवनागरी लिपीचा वर्णक्रम, मराठीतील विशेषनामांचे उच्चारण-लेखन, विरामचिन्हे आणि मराठीच्या श्रवणप्रत्ययी लेखनावरही अभ्यासपूर्ण भाष्य केले.

भाषिक अभ्यासाच्या जोडीलाच साहित्याची आवड आणि समजही केळकरांना होती. त्यामुळेच लक्ष्मण मानेंच्या 'उपरा' या आत्मचरित्राचा भाषिक धांडोळा घेताना केळकरांचे लेखन वाचत राहावेसे वाटते आणि त्यातून 'उपरा'ची नवी ओळख होते. तर भालचंद्र नेमाडे (कोसला), अरुण कोलटकर, पुरुषोत्तम पाटील, कुसुमाग्रज आणि विंदा करंदीकर यांच्या कवितांचाही बारकाईने अभ्यास त्यांनी केलेला दिसतो. साहित्यातून दिसणारी वेगळी भाषा, बालकांची वेगळी भाषा यांचीही सुंदर निरीक्षणे केळकरांनी नोंदवलेली आहेत.

खरेतर केळकरांना कलेतील कोणताच विषय वर्ज्य नसावा. त्यामुळे कलाप्रांतातील सर्वच संदर्भ त्यांच्या विवेचनात डोकावतात. आपला विचार स्पष्ट करून सांगताना,





अनुक्रमणिका

केळकर त्याचे जे विविधांगी संदर्भ देतात, त्याचा अभ्यासकाला खूपच उपयोग होतो. त्यामुळेच एकंदर भारतीय ललितकला - नृत्य, संगीत, वक्तृत्व, नाट्य इत्यादींचा विचार करताना केळकर त्या कलाप्रांतांचा केवळ इतिहासच शोधून थांबत नाहीत, तर प्रत्येक कलेच्या आविष्काराचा आणि त्यातील प्रथा-परंपरांचाही स्वतंत्र आणि परस्परसापेक्ष विचार करतात. त्यातही नाटक आणि कविता या दोन प्रकारांवर केळकरांनी केलेले विवेचन ('रुजुवात') सर्वांनीच आवर्जून वाचावे असे आहे. या सर्व कलांचा आणि भाषेचा-आविष्काराचा संबंधही ते उलगडून दाखवतात.

'कवितेचे अध्यापन' या स्वतंत्र पुस्तिकेत, कविता या वाङ्मयप्रकाराचा मुळातून केलेला विचार प्रत्येकाने वाचण्यासारखा आहे. कविता लिहिणारा कवी, ती वाचणारा रसिक आणि ती शिकवणारा अभ्यासक या तिघांच्याही भूमिका कशा असायला हव्यात, हे समर्पक शब्दांत आणि अभ्यासाच्या एका शिस्तीत केळकरांनी सांगितले आहे.

केळकर जसे उत्तम प्राध्यापक होते, श्रेष्ठ संशोधक होते, सखोल अभ्यासक होते, तसेच ते चांगले लेखकही होते. आपल्या लेखनात एक शिस्त असायला हवी, हे तत्त्व त्यांनी आयुष्यभर जपले. त्यामुळे त्यांच्या कोणत्याही लेखाच्या अखेरीस तपशीलवार नोंदवलेली संदर्भसूची असे. त्यांच्या पुस्तकांत आजवरच्या त्यांच्या लेखनाची सूची असे. मराठी ज्ञानभाषा व्हायची असेल तर विविध विषयांवरचे ज्ञान मराठीत यायला हवे, त्याकरता त्या क्षेत्राची परिभाषाही तयार व्हायला हवी, या भूमिकेतून त्यांनी लैंगिक विषयासारख्या तोवर अपरिचित/अस्पर्शित विषयांवर लेखन केले. त्या त्या विषयांची परिभाषा-सूचीही सोबत जोडली. विरामचिन्हे, लेखनविषयक नियम, परभाषेतले उच्चार इत्यादी विषयांतील त्यांची भूमिका आणि त्यांचे लेखन यात अद्वैत होते. आपल्या संपादकीय कारकीर्दीत तर त्यांनी या सर्वच गोष्टी कटाक्षाने पाळल्या. सोबतीलाच मुद्रणाचे तंत्रज्ञान आणि त्याचे आकर्षक रूप याविषयीही मांडणी करून त्यांनी भावी संपादकांना योग्य दिशादर्शनही घडवले.

अशोक केळकर गेल्यामुळे भाषा, साहित्य आणि संस्कृती या संदर्भातील विविधांगी लेखन करणारा एक द्रष्टा अभ्यासक हरपला आहे. वार्धक्यामुळे आणि आजारपणामुळे त्यांचे निधन तसे अपेक्षितच होते; पण त्यामुळे मराठी समाजाचे झालेले नुकसान आपल्याला खूप उशिरा कळणार आहे. मराठी अभ्यास परिषदेला मात्र त्यांची उणीव पदोपदी जाणवत राहील. ■

---

## देणगी

परिषदेला प्रा०प्र०ना० परांजपे यांनी रु. ५,०००/- देणगी दिली आहे. परिषद त्यांची आभारी आहे.

---





अनुक्रमणिका

दोन

## शब्दों के बीच

- कुँवर नारायण

अर्थ है वह खाली जगह भी
जो शब्दों के बीच होती
जिसमें उज्ज्वलता भरते ही
शब्द जगमगाने लगते

यह पृष्ठ-
एक निरभ्र खाली जगह
उस पर लिखते ही फूल
वह खिल उठता

फासले जो शब्दों को अलग करते
उन्हें एक दूसरे अर्थ में जोड़ते भी

विवशता उस प्यार की जो एक दूरी है
सामर्थ्य उस प्यार की जो जीवन है

■

अनुवाद

# शब्दांच्या मध्ये

अनुवाद - कैलास सार्वेकर

अर्थ आहे त्या कोऱ्या जागेलाही
जी शब्दांमध्ये असते
जिच्यात प्रकाश भरताच
शब्द झगमगून उठतात

हा कागद
एक निरभ्र नीरव जागा
त्यावर लिहताच 'फूल',
ते उमलून उठते

अंतरं जी शब्दांना तोडतात
त्यांना जोडतातही दुसऱ्या अर्थाने

नाइलाज आहे त्या प्रेमाचा, जे एक अंतर आहे
सामर्थ्य आहे त्या प्रेमाचे, जे जीवन आहे

■

दोन

# भाषा की ध्वस्त पारिस्थितिकी में

- कुँवर नारायण

प्लास्टिक के पेड़
नाइलॉन के फूल
रबर की चिड़ियाँ
टेप पर भूले बिसरे
लोकगीतों की
उदास लड़ियाँ...
एक पेड़ जब सूखता
सबसे पहले सूखते
उसके सबसे कोमल हिस्से-
उसके फूल
उसकी पत्तियाँ ।
एक भाषा जब सूखती
शब्द खोने लगते अपना कवित्व
भावों की ताज़गी
विचारों की सत्यता-
बढ़ने लगते लोगों के बीच
अपरिचय के उजाड़ और खाइयाँ...
सोच मे हूँ कि सोच के प्रकरण में
किस तरह कुछ कहा जाय
कि सब का ध्यान उनकी ओर हो
जिनका ध्यान सब की ओर है-
कि भाषा की ध्वस्त पारिस्थितिकी में
आग यदि लगी तो पहले वहाँ लगेगी
जहाँ ठूँठ हो चुकी होंगी
अपनी जमीन से रस खींच सकनेवाली शक्तियाँ ।

■

अनुवाद

# भाषेच्या उद्ध्वस्त अवस्थेत

अनुवाद - कैलास सार्वेकर

प्लॅस्टिकची झाडं
नायलॉनची फुलं
रबराच्या चिमण्या
टेपवर विस्मरणातल्या
लोकगीतांच्या
उदास लकेरी...
झाड जेव्हा सुकते
सर्वात अगोदर सुकतात
त्याचे सर्वात कोमल भाग-
त्याची फुलं
त्याची पानं.
एक भाषा जेव्हा आकसू लागते
तेव्हा हरवू लागते तिच्या शब्दांतील काव्य,
भावनांचे ताजेपण
विचारांचे खरेपण
वाढू लागतात लोकांमधील
अपरिचयाची वाळवंटे आणि दऱ्या...
विचारात पडलोय की विचारांच्या प्रकरणात
कशा प्रकारे काही सांगावं
की ज्यामुळं सर्वांच लक्ष त्यांच्याकडे जाईल
ज्यांचं लक्ष सर्वांकडे आहे-
भाषेच्या उद्ध्वस्त अवस्थेत
आग लागली तर प्रथम तिथं लागेल
जिथं वठून गेल्या असतील
आपल्या मातीतून रस शोषून घेणाऱ्या शक्ती

■

# कोंकणीतील महाप्राण आणि 'फ'चे उच्चारण

माधवी सरदेसाय
अनुवाद : विद्या प्रभुदेसाई

'प्राण' या संस्कृत भाषेतील शब्दाचा अर्थ 'श्वास/उच्छ्वास', 'अल्पप्राण' म्हणजे कमी, दुर्बल उच्छ्वास, आणि महाप्राण म्हणजे अधिक, जोराचा उच्छ्वास. अल्प-प्राण/महाप्राण या संस्कृत ध्वनिशास्त्रातील अत्यंत महत्त्वाच्या संकल्पना आहेत आणि म्हणूनच देवनागरी लिपीत अल्पप्राण आणि महाप्राण दाखविणारी वेगवेगळी चिन्हे आहेत.

क, च, ट, त आणि प या पाचही वर्गातील व्यंजनांची मांडणी ध्वनिविज्ञानाच्या तत्त्वाला अनुसरून केलेली दिसते. क्, ख्, ग्, घ् हा पहिलाच ध्वनिवर्ग घेतल्यास या वर्गातील पहिली चार मौखिक व्यंजने आहेत (या व्यंजनांच्या उच्चारात फुफ्फुसात घेतलेला श्वास मुखावाटे बाहेर सोडला जातो.) तर शेवटचे ङ् हे व्यंजन नासिक्य (याच्या उच्चरणात उच्छ्वास नाकाच्या मार्गाने बाहेर सोडला जातो.) व्यंजन आहे. क्, ख्, ग्, आणि घ् यांतील क् आणि ख् ही व्यंजने अघोष (त्यांच्या उच्चारात कंठातील ध्वनितंत्रीचे कंपन ऐकू येत नाही.) ग आणि घ ही व्यंजने घोष (त्यांच्या उच्चारात ध्वनितंत्रीचे कंपन ऐकू येते.) व्यंजने आहेत. या दोन जोड्यांतील व्यंजनांपैकी पहिली (क आणि ग) ही व्यंजने अल्पप्राणाची-दुर्बल उच्छ्वासाची उदाहरणे आहेत, तर दुसरी (ख् आणि घ्) महाप्राणाची-जोराच्या उच्छ्वासाची उदाहरणे आहेत.

क्, च्, ट्, त्, प्, ग्, ज्, ड्, ब् हे अल्पप्राण आहेत, तर ख्, छ्, ठ्, थ्, फ्, झ्, ढ्, ध्, भ् हे महाप्राण आहेत. ज्यांच्या मातृभाषेत अल्पप्राण, महाप्राण नाहीत त्यांना हा फरक समजण्यासाठी मुखावर हात ठेवून ही व्यंजने उच्चारण्यास सांगितल्यास हा उच्छ्वासातील फरक लक्षात येईल. या पद्धतीनी कोणालाही अल्पप्राण महाप्राण हा भेद शिकवता येऊ शकतो असे काकासाहेब कालेलकर भाषिक सर्वेक्षणाच्या क्षेत्रातील आपल्या अनुभवाच्या आधारे विश्वासाने सांगत असत.

कोंकणी ही संस्कृतभाषाकुळातील भारतीय आर्यभाषा होय. इतर भारतीय आर्यभाषांप्रमाणेच कोंकणीतही अल्पप्राण/महाप्राण व्यंजनभेद आहेत. असे असले तरी संस्कृत भाषेप्रमाणे कोंकणीतील व्यंजनभेद प्रभावी असलेला दिसत नाही.

कोंकणीच्या व्याकरणिक घडणीचा सूक्ष्मपणे अभ्यास केलेल्या सु० म० कत्रे यांच्या मते कोंकणीत महाप्राण आलेच तर ते फक्त शब्दाच्या आरंभीच येतात; शब्दांच्या मध्ये

आणि शेवटी अल्पप्राणच असतात. कोंकणी लेखनात मात्र भाषेत नसलेले हे महाप्राणही दाखविले जातात, असे सांगताना कत्रे मों० दाल्गाद यांच्या कोंकणी (कोंकणी-पोर्तुगीज) कोश आणि शेणै गोंयबाब यांच्या लिखाणाचे दाखले देतात. या लेखनात कोंकणी 'खरी आहे तशी' लिहिलेली दिसत नाही; इतर भारतीय आर्यभाषा आणि शब्दांच्या मूळ रूपांचा प्रभावही तिच्यावर पडलेला दिसतो असे ते म्हणतात. (पाहा : कत्रे ५४-५८).

कोंकणीत शब्दाच्या अन्त्य आणि मध्य स्थानी महाप्राण नसतात हे विधान ऐतिहासिक दृष्टीने सत्य असले तरी मॅथ्यु अल्मेदांच्या मते आजच्या कोंकणीवरील प्रभावांचा संदर्भ लक्षात घेतल्यास कोंकणीने तिच्या इतर भगिनीभाषा आणि संस्कृतकडून शब्दांतील अन्त्य आणि मध्य महाप्राण उचललेले दिसतात या गोष्टीकडे दुर्लक्ष करता येत नाही.

आल्मेदांच्या मते कोंकणी बोलीत महाप्राणी उच्चारांची विविधता दिसून येते. कोंकणीच्या प्रांतिक भेदांनुसार उत्तरेकडील 'बार्देशी' बोलीत सर्वांत अधिक महाप्राण आढळतात, तर दक्षिणेकडील मंगळुरी बोलीत सर्वांत कमी महाप्राण आढळतात. या दोन स्थानिक सीमांच्या मधल्या पट्ट्यात महाप्राण उच्चाराचे विविध भेद आढळतात.

'ॲस्पिरेशन इन कोंकणी' या शोधनिबंधात आल्मेदांनी कोंकणीतील महाप्राणी उच्चाराचा सर्व अंगांनी अभ्यास करून काही निरीक्षणे मांडली आहेत. असे असले तरी काही प्रश्न अनुत्तरितच आहेत. 'बार्देशी' आणि 'मंगळुरी' या एकांगी आणि एकरूप बोली नाहीत. कोंकणीच्या स्थलबोलींमध्ये यांचा समावेश होतो. कोंकणीच्या या स्थलबोलीअंतर्गत जाती-धर्मानुसार भेद दाखविणाऱ्या आणखीही अनेक बोली आहेत. या सामाजिक बोलींमध्ये, प्रामुख्याने धार्मिक बोलीभेदांत, महत्त्वाचे स्वनिमिक भेद आहेत. हिंदू आणि ख्रिस्ती बोलींतील महाप्राणाच्या उच्चारात बरेच भेद आहेत.

दुसरी गोष्ट म्हणजे, मराठी बोलीच्या सर्वेक्षणाअंतर्गत ए० एम० घाटगे यांनी केलेल्या बोलींच्या अभ्यासात काही कोंकणीच्या बोलीही होत्या. (कोंकणी 'मराठीची बोली' म्हणून, कोचीची कोंकणी, मंगळूरची कोंकणी, काणकोणची कोंकणी, साष्टीच्या ख्रिस्ती गावड्याची कोंकणी, या साऱ्या मराठीच्या बोली या युक्तिवादाने या सर्वेक्षणाचा अभ्यास व्यापला आहे.) घाटगेंच्या या सर्वेक्षणात मंगळुरी आणि कोचीच्या कोंकणी वर्णनात महाप्राणांची नोंद सापडते. म्हणूनच आधुनिक स्वनवैज्ञानिक साधनांच्या आधारे या विषयाचा अधिक शोध घेण्याची गरज आहे असे वाटते.

ख्, घ्, छ्, झ्, ठ्, थ्, ध्, फ्, भ् हे महाप्राण भारतीय आर्यकुळांच्या परंपरेने कोंकणीला मिळाले होते. या महाप्राणाशिवाय आणखीही काही महाप्राण विकसित झाले आहेत.

**(१) नासिक्य व्यंजनांचे महाप्राण**

न्ह् आणि म्ह् हे दोन नासिक्य महाप्राण कोंकणीत आहेत. कोंकणीत 'न्'च्या ऐवजी 'न्ह्' आणि 'म्'च्या ऐवजी 'म्ह्' घेतल्यास शब्दाचे अर्थ बदलतात.

उदा० 'ना/न्हा', 'मण/म्हण' अशी युग्मे दाखवितात येतात.

**(२) 'ल्'चा महाप्राण**

कोंकणीत 'ल्'प्रमाणेच 'ल्ह्'ही आहे. 'लाय' या शब्दात 'ल'च्या ऐवजी 'ल्ह' घातल्यास 'ल्हाय' हा वेगळा अर्थ निर्माण करणारा शब्द होतो.

'ल्ह्'प्रमाणेच 'ऱ्ह्' हा 'र'चा महाप्राणही कोंकणीत असावा असे मॅथ्यु आल्मेदा म्हणतात. 'रास/ऱ्हास' ही अल्पतम जोडी उदाहरणासाठी दाखविता येते. असे असले तरी कोंकणी जिभेवर 'ऱ्हास' हा शब्द महाप्राणाच्या उच्चारानेच केला जाईल असे निश्चितपणे सांगता येणार नाही असेही ते पुढे लिहितात. त्यांच्या या निरीक्षणात बरेच तथ्य आहे. कारण कोंकणीत 'ऱ्हस्व' हा शब्द 'रस्व' असाच उच्चारला जातो.

**(३) अर्धस्वरांचे महाप्राण**

कोंकणीत 'व' हा अर्धस्वर आहे. तसाच त्याचा महाप्राण 'व्ह' हाही आहे. 'वड/व्हड', 'वाळ/व्हाळ', 'वीर/व्हीर' या अल्पतम युग्मांवरून कोंकणीत महाप्राण किती महत्त्वाचा आहे हे लक्षात येते. कोंकणीत 'य' या अर्धस्वराचा महाप्राणही आहे; परंतु 'व्ह्'च्या तुलनेत 'य्ह्'चा वापर कमी केला जातो असे मॅथ्यु आल्मेदा लिहितात. कोंकणी लिखाणात हा महाप्राण योग्य रीतीने लिहिला जात नाही, तो उलटा म्हणजे आधी 'ह्' आणि नंतर 'य्' असा लिहिलेला दिसतो असेही ते सांगतात. 'या/ह्या' ही जोडी अल्पप्राण/महाप्राण भेदाचे महत्त्व दाखविते.

सोळाव्या शतकातील रोमी लिपीतील कोंकणी लिखाणाच्या शैलीत 'yh' सापडत नसले तरी कोंकणीत हा महाप्राण होता असे मानण्यास भरपूर वाव आहे असे रॉकी मिरांदा म्हणतात. (दि ओल्ड कोंकणी लँग्विज' २९५) 'हो', 'हे' या शब्दांच्या सामान्यरूपांचा उच्चार (yha) असाच होत असावा असेही ते म्हणतात. जुन्या कोंकणी लिखाणात 'हो' हा शब्द कधी कधी 'uho' असा लिहिलेला सापडतो. याचा अर्थ त्याचा 'व्हॉ' असा उच्चार होत असावा आणि त्यानुसारच 'हे'चा 'य्हे' असा उच्चार होत असावा असेही ते म्हणतात.

मॅथ्यु आल्मेदांच्या मते कोंकणीत स्वरांचेही महाप्राण आहेत. कोंकणी लिखाणात शब्दाच्या आरंभी 'ह' असलेले कितीतरी शब्द आहेत. परंतु हा 'ह' कोंकणीत - मराठीसारख्या 'परकी' भाषेच्या प्रभावातून आला. ज्यांच्यावर असा प्रभाव नाही अशा

निजकोंकणी भाषकांच्या जिभेवर 'हजार'चा उच्चार 'अहजार' असा होतो असे आल्मेदा म्हणतात.

परंतु संस्कृत आणि कोंकणीच्या भाषाभगिनींच्या भाषेत शब्दाच्या आरंभी 'ह' येतो. जर असेच कोंकणीत घडले तर भाषाकुळाच्या परंपरेतूनच ते कोंकणीत आले असे म्हणता येते. कोंकणीच्या काही बोलींत ते नसून त्यांची जागा स्वरांच्या महाप्राणानी घेतली असल्यास हे परिवर्तन नंतर घडून आले असे म्हणता येते. या ठिकाणीही अभ्यासाला वाव आहे.

### ओष्ठ्य 'फ' [$p^h$] आणि दंत्योष्ठ्य फ[*f*]

मागे सांगितल्याप्रमाणे देवनागरी लिपीतील वर्णचिन्हांच्या मांडणावळीला ध्वनिविज्ञानाची बैठक आहे. क, ट, त आणि प या वर्गातील व्यंजनांच्या उच्चारणाची एक पद्धत असते. फुफ्फुसातून आंत घेतलेला श्वास बाहेर सोडताना जीभ अथवा ओठ त्या श्वासाला कोणत्या तरी एका जागी अडवतात आणि नंतर ती अडवणूक पूर्णपणे सोडतात. क वर्गाच्या उच्चारणात मृदू तालुपाशी हा अडथळा केला जातो, ट वर्गाच्या उच्चारणात कठोर तालुकडे, त वर्गाच्या उच्चारणात दांतामागे, आणि प वर्गाच्या उच्चारणात ओठाकडे अडवलेली हवा जीभ अथवा ओठ सोडतात तेव्हा तुंबवून ठेवलेल्या उछ्वासाचा थोडासा स्फोट ऐकू येतो. म्हणून यांना स्फोट व्यंजने म्हणतात. (प्लोसिव्हज)

च वर्गातील व्यंजनांचे उच्चारण थोडे वेगळे होते. त्यात उच्छ्वास पूर्ण अडवला जातो आणि सोडताना थोडेसे घर्षण होते त्याचा नाद ऐकू येतो. म्हणून त्यांना 'स्फोट घर्षक व्यंजने (ॲफ्रिकेट्स) असे म्हणतात. कोंकणीत या व्यंजनांचे दोन वर्ग आहेत. एक 'चार' (अंक) या शब्दातील तालव्य च चा वर्ग; दुसरा (पणसाची) 'चार' या शब्दातील दन्त्य 'च'चा वर्ग.

क ते प पर्यंतच्या प्रत्येक व्यंजनाची मांडणी अशा क्रमाने आढळते. मौखिक अघोष अल्पप्राण, मौखिक अघोष महाप्राण, मौखिक घोष अल्पप्राण, मौखिक घोष महाप्राण, नासिक्य(घोष) अल्पप्राण.

परंतु प वर्गाच्या माळेत मात्र बहुतेक वरील व्यवस्था बदललेली दिसते. या व्यवस्थेतील मौखिक अघोषओष्ठ्य महाप्राणी व्यंजनाची जागा [$p^h$] मौखिक दंत्योष्ठ्य घर्षक व्यंजनाने [f] घेतलेली दिसते.

उच्चारणस्थान आणि उच्चारणपद्धती या दोनही दृष्टींनी [f] हे व्यंजन [$p^h$]पेक्षा वेगळे आहे. [f] या व्यंजनाच्या उच्चारणात मुखावाटे बाहेर येणाऱ्या उछ्वासाला खालील ओठ वरील दंतपंक्तीकडे अडवतात. म्हणून हे दंत्योष्ठ्य व्यंजन. [$p^h$] हे ओष्ठ्य व्यंजन. उच्चारणाच्या दृष्टीने [f] हे घर्ष व्यंजन. घर्ष व्यंजनाच्या उच्चारणाच्या वेळी उछ्वासाला

पूर्ण अडथळा होत नाही. अडथळ्यात जी फट असते त्यातून उच्छ्वास घर्षण करीत बाहेर येतो. म्हणून अशा प्रकारची व्यंजने बराच वेळ उच्चारता येतात. स्फोट व्यंजनांचे उच्चारण मात्र थोड्याच वेळापुरते असते. ते त्यांचे स्वचेच उच्चारण असते.

आल्मेदांच्या मते जुन्या कोंकणीत [pʰ] हे व्यंजन बहुधा असावे, कारण घाटमाथ्यावर वसणूक करून राहिलेल्या कोंकणी भाषकांच्या जिभेवर ते आढळते. इतर बोलीभेदांमध्ये मात्र याची जागा [f] व्यंजनाने घेतल्याचे दिसते.

कत्रेंच्या मते, सामान्यपणे कोंकणीच्या सर्व ख्रिश्चन बोली आणि हिंदूंच्या काही बोलींमध्ये उदा० उत्तर कर्नाटकातील सारस्वत आणि गौड सारस्वतांच्या कोंकणीत, गोव्यातील हिंदूंच्या कोंकणीत [pʰ] ऐवजी [f] वापरलेला दिसतो, आणि कोंकणीच्या रोमी लिखाणात या व्यंजनासाठी [f] हेच चिन्ह वापरलेले दिसते. (६४-६५)

कत्रेंचा अभ्यास कोंकणीच्या सहा प्रातिनिधिक बोलींवर आधारलेला होता. तीन हिंदू बोली आणि तीन ख्रिस्ती बोली : (१) कर्नाटकातील चित्रापुर स्वारस्वतांची कोंकणी, (२) गौड सारस्वतांची कोंकणी, (३) (प्रामुख्याने शणै गोंयबाबांच्या लेखनात आणि गोमंतक छापखान्याच्या 'नवें गोंय' या मासिकात छापून आलेली कोंकणी) गोव्याच्या सारस्वतांची कोंकणी, (४) मंगळूर आणि दक्षिण कर्नाटकातील ख्रिश्चनांची कोंकणी, (५) उत्तर कर्नाटकातील ख्रिश्चनांची कोंकणी आणि (६) गोव्यातील ख्रिश्चनांची कोंकणी. (आवश्यकतेनुसार कत्रेंनी इतर बोलींचे संदर्भ दिले आहेत.)

रॉकी मिरांदा यांनीही आपल्या पीएच०डी०च्या प्रबंधासाठी ('सिंक्रॉनिक अँड हिस्टॉरिकल फोनॉलॉजि ऑफ सिक्स कोंकणी डायलेक्ट्स') कोंकणीच्या सहा प्रातिनिधिक बोलींच्या स्वनिम व्यवस्थेचा अभ्यास केला - (१) बार्देसच्या हिंदु बामणांची कोंकणी, (२) बार्देसच्या ख्रिस्ती बामणांची कोंकणी, (३) साष्टीच्या हिंदु बामणांची कोंकणी, (४) साष्टीच्या ख्रिस्ती बामणांची कोंकणी, (५) मंगळूरच्या हिंदु बामणांची कोंकणी, (६) मंगळूरच्या ख्रिस्ती बामणांची कोंकणी. या सर्व प्रकारांमध्ये फक्त साष्टीच्या ख्रिस्ती बामणांच्या कोंकणीत त्यांनी [f]ची नोंद केली आहे. या कोंकणीत 'फूल' या शब्दाचा उच्चार [ful] असा होतो. मंगळूरच्या हिंदू बामणांच्या कोंकणीत तो [pʰule] असा होतो, तर इतर चार बोलींमध्ये तो [pʰul] होतो असे ते सांगतात.(४३)

कोणत्या आणि कुठल्या कोंकणीत [f] वापरला जातो आणि कोणत्या कोंकणीत [pʰ] वापरतात याविषयीही अधिक अभ्यास होण्याची गरज आहे. गोव्याच्या कोंकणी-संबंधी माझ्यासारख्या कोणत्याही कोंकणी भाषकाला विचारल्यास गोव्यात फक्त पेडण्याच्या कोंकणीत [pʰ] ऐकू येत असून बाकी ठिकाणी [f]च कानावर पडते असे उत्तर मिळेल.

आज गोव्याच्या जास्तीत जास्त कोंकणी बोलणाऱ्यांमध्ये 'नीजाचे गोंयकार' (मूळ

गोमंतकीय) असलेल्यांच्या बोलण्यात [f] असा उच्चार येतो तर, 'भायलो' (बिगर गोमंतकीय) असलेल्यांच्या बोलण्यात (मराठीच्या प्रभावामुळे) [p$^h$] असा उच्चार दिसतो.

मूळ कोंकणीत [f] हा उच्चार होता की [p$^h$] होता? पूर्वी कोंकणीत [f] होता आणि नंतर काहीं बोलींमध्ये [p$^h$] असा उच्चार आला, की [p$^h$] हा उच्चार आधीचा असून त्याची जागा आता [f] या उच्चाराने घेतली आहे?

या गोष्टींचा शोध घेण्यासाठी सोळाव्या-सतराव्या शतकांतील हस्तलिखित लेखनाचा खूप उपयोग होऊ शकतो.

सतराव्या शतकांत पाद्री दियोग रिबेयरीन यांनी संकलित केलेल्या कोंकणी-पोर्तुगीज शब्दकोशात [f]ने, सुरू होणारा एकही शब्द नाही. संकलक वाचकांना [p$^h$]मध्ये पाहण्यास सांगतात. ("busca ph", पान नंबर ५३ मागची बाजू), या ठिकाणी [p$^h$]ने सुरू होणारे कितीतरी शब्द आहेत.

उदाहरणासाठी : phada(फडा), phaguru(फागुरु), phaguramay (फागुर्माय), phagurumau(फगुरुमाऊं), phalea(फाल्यां), phalla(फळ), phante(फांते), phaparu(फापारु), pharmanna(फर्माण), phatti(फटि), phencho(फेंचो), phikiru(फिकिरु).

पाद्री थॉमस स्टीफन्स यांच्या 'दौत्रिन क्रिश्ता' या पुस्तकात phauale(६६), phauatati(१२६), phudda(८२,१५५), phude(१०८) phalla(८५), phallu(१२३), pharica(११३), phatti/phattau(१३७), आणि pharmaita(१४०) ही [p$^h$] दाखविणारी व्यंजने असलेले शब्द आढळतात. [f]ने दाखविलेले दोनच शब्द 'दौत्रिनाक्रिश्ता'मध्ये आले आहेत. --fee(६४) आणि profetu(६५). 'प्रोफेतु' हा शब्द पान क्रमांक ६६वर prophetu(६५) अशा पद्धतीने [p$^h$]चा वापर करूनही लिहिलेला आढळतो. [f]चा वापर करून लिहिलेले हे दोनही शब्द पोर्तुगीज भाषेतील आहेत : fe(faith) आणि profeta ('prophet').

'जुन्या कोंकणी भारता'च्या हस्तलिखितात [p$^h$]प्रमाणेच [f]ही सापडल्याचे रॉकी मिरांदा सांगतात. ते म्हणतात, 'phula, phonddu, phugiro, phalem, हे शब्द fula, fondu, fugiro, falem' असेही लिहिलेले दिसतात. म्हणूनच या हस्तलिखितातील [p$^h$]चे उच्चारण जसे आज गोव्याच्या कोंकणीत केले जाते तसे कदाचित [f]ही होत असावे किंवा त्या काळातील कोंकणीत [p$^h$] आणि [f]मध्ये 'सहज बदल' (free variation)ही होत असावे असे त्यांना वाटते. ('The Old Konkani Language' २९४)

परंतु कोचीच्या कोंकणीत [f] नसून [p$^h$] आहे. (पहा Ghatage Cochin)

पोर्तुगीज राजवटीच्या आरंभीच्या बाटाबाटीच्या काळात गोव्याबाहेर वसाहत करून





अनुक्रमणिका

राहिलेल्यांमध्ये कोचीच्या कोंकणी लोकांचा समावेश आहे. साष्टी आणि बार्देश प्रदेशातील लोक कोचीत स्थलांतरित झाले. (अधिक माहितीसाठी शणै गोंयबाब १२८-३१ पहा.) या लोकांच्या कोंकणीत [pʰ] कुठून आले?

कोचीची कोंकणी मंगळूरच्या हिंदू कोंकणीला जवळची आहे. मंगळूरच्या हिंदूंचे पूर्वज मूलतः गोव्यातील साष्टीवासी. सोळाव्या शतकात ते गोव्यातून मंगळूरला गेले. (पाहा - मिरांडा 'सिंक्रॉनिक...' (२) घाटगे यांच्या सर्वेक्षणानुसार मंगळूर येथील सारस्वतांच्या कोंकणीत [pʰ] आणि [f] दोन्ही आहेत. (Konkani of South Kanara 12). परंतु त्यांनी दिलेल्या उदाहरणामध्ये [pʰ] असलेली अधिक उदाहरणे असून त्यामानाने [f] व्यंजन असलेली उदाहरणे फार कमी आहेत. 'फळ', 'फात्तरु', 'फाटि', 'फुल'(१३२) असे काही आर्यभारतीय भाषेतील शब्द आहेत तर, [f] बहुधा 'फी' (१२), 'कॉफी' (१२३), 'तोफ' (१२८), 'आफू'(१२१), 'फायदो' (१४०), अशा काही दुसऱ्या भाषेतून घेतलेल्या शब्दांत आहे. या सर्वेक्षणातील नोंदींमध्ये 'कफ' (१२) आणि 'वाफ' (१३७) या मूळ आर्यभारतीय शब्दांतील [f] व्यंजनाची नोंदही सापडते. परंतु 'कफ' या शब्दाची (Ka:p) अशी [pʰ] सहित नोंदही सापडते. (Ka:pʰa)

कोंकणीच्या भगिनी भाषांमध्येही [pʰ] आहे. मराठीच्या व्याकरणव्यवस्थेत [pʰ] या ध्वनीलाच महत्त्व दिलेले दिसते. भारतीय आर्यकुळाच्या मराठी भाषेत सामान्यपणे [pʰ] हाच व्यंजन-ध्वनी आढळतो. परंतु डॉ० अशोक केळकर म्हणतात, आज मराठीत आलेल्या परकी शब्दांमधून [f] हा व्यंजनध्वनीही मराठीत आलेला दिसतो. त्यांच्या मते, 'फायदा', 'फाजील', 'नफा', 'अफू/अफीम', 'फी', 'फुटबॉल' या आणि अशासारख्या परकी भाषेतून आलेल्या मराठी शब्दांत [pʰ] येत असला तरी 'ऑफीस', 'फोन', 'फॅशन', या शब्दांच्या उच्चारांत [pʰ] आणि [f] असे दोनही व्यंजनध्वनी वापरलेले दिसतात. 'फायर करणे' यातील 'फायर' हा शब्दही अशा दोन्ही उच्चारांनी उच्चारला जातो; परंतु 'फायर इंजिन' या शब्दात मात्र 'फायर'चा उच्चार [f] असाच होतो. 'फिजिक्स' 'ट्रॅफिक'सारख्या शब्दांतही असाच उच्चार केला जातो. केळकरांच्या मते भाषेत परकी शब्द आलेला काळ आणि तोच प्रमाण शब्द म्हणून घेण्यासाठी लागणारे इंग्रजीचे ज्ञान यासारख्या गोष्टींवर 'फ'च्या उच्चाराचे वेगळेपण अवलंबून असते. मागच्या दोन दशकांत मराठीतील [pʰ]ची जागा [f] घेऊ लागल्याचे, निजभाषेतही हा बदल होऊ लागल्याचे भाषावैज्ञानिकांचे निरीक्षण सांगते. हा बदल सर्वप्रथम मुंबईतील चांद्रसेनीय कायस्थ प्रभू (सीकेपी) समाजातील मराठी भाषकांमध्ये झाला आणि नंतर तो इतर बोलणाऱ्यांनी उचलला असेही म्हटले जाते. (मराठीतील [pʰ]/[f] भेदांविषयीची ही माहिती अशोक केळकर यांनी दिली.)





अनुक्रमणिका

हिंदीतही [f] हा व्यंजनध्वनी आहे. तो फारसी-अरबी प्रभावातून हिंदीत आला असे मानले जाते. परंतु हिंदीत [$p^h$] ही आहे. आर्य भारतीय कुळातील निजभाषेतील शब्दांत [$p^h$] आणि फारसी-अरबी आणि इंग्रजीकडून घेतलेल्या परकी शब्दांत [f] अशी विभागणी हिंदी ध्वनिव्यवस्थेत केलेली दिसते.

ऐतिहासिक दृष्टीने विचार केल्यास [$p^h$] कोंकणीचे स्वत:चे आणि [f] परकी भाषेतून घेतलेले असे एकदा मान्य केले म्हणजे कोंकणीतील [$p^h$]ची जागा [f]ने कधी आणि का घेतली असा प्रश्न उपस्थित होतो.

या प्रश्नाचे उत्तर कोंकणीवरील प्रभावाच्या, तिच्या उधार भाषिक व्यवहाराच्या अभ्यासातून मिळू शकते.

जवळच्या भाषेच्या सततच्या संपर्कामुळे एखाद्या परकी भाषेतील ध्वनी निजभाषेत स्वीकारले जावेत ही गोष्ट तशी भाषिक इतिहासात नवी नाही. लेनर्ड ब्लूमफिल्ड यांच्या मते भाषांमध्ये शब्दांची देवाणघेवाण होते तेव्हा आणि जेव्हा ग्रहण-भाषकांना परकी भाषेची अधिक सवय असते तेव्हा, तसेच जेव्हा असे परकी भाषेतील शब्द अधिक प्रमाणात घेतले जातात, तेव्हा निजभाषेतील स्वनव्यवस्थेच्या आड येणारे ध्वनीही ग्रहण-भाषेकडून घेऊन निजभाषेत सांभाळून ठेवले जातात. (४४७)

स्कँडनेव्हियन या परक्या शब्दामुळे इंग्रजी भाषेने स्क(sk) हे जोडव्यंजन घेतले. हे जोडव्यंजन sky, skin, skirt अशा परकी शब्दांमध्ये आहे. तसेच scatter, scrawl, scream अशा भाषेने नंतर घडविलेल्या शब्दांमध्येही ते सापडते असे ब्लूमफिल्ड सांगतात. तसेच फ्रेंच भाषेच्या प्रभावामुळे (z) आणि (j) हे ध्वनी इंग्रजीत आरंभी येऊ लागले. -zip, zoom, jab, jounce असे शब्द इंग्रजीत या अशा प्रभावातून आल्याचे ते लिहितात. (मागील संदर्भ)

पोर्तुगीज भाषेशी संपर्क येण्यापूर्वी कोंकणीचा संपर्क फारसी आणि अरबी भाषांशी आला होता. जुन्या कोंकणीत फारसी-अरबीप्रमाणे 'फ' असलेले शब्द सापडतात. - 'फर्माण' (vocabulario १८८), 'फरमाइता' (Esteuao १४०), 'फारिक' (Esteuao ११३), 'फुरसति' (vocabulario ४९४) असे शब्द कोंकणीत आले; परंतु या शब्दातील [f]ची जागा कोंकणीच्या स्वत:च्या [$p^h$]ने घेतली. थोडक्यात कोंकणीने हे शब्द आपल्या स्वभावानुसार स्वीकारले असे वाटते.

पोर्तुगीज राजवटीच्या काळात सुमारे साडेचारशे वर्षे कोंकणी भाषेचा संपर्क पोर्तुगीज भाषेशी आला. या भाषेकडून कोंकणीने कितीतरी शब्द घेतले. यात [f] हा ध्वनी असलेले काही शब्दही घेतले. उदाहरणार्थ - (शब्दारंभी [f] असलेले शब्दच या ठिकाणी घेतले आहेत.) : फाल्स, फाल्त, फाम, फामाद, फाती, फांत, फावोर, फेस्त, फेलीस, फेर्याद, फेर्र, फेर्राद, फिदाल्ग, फुगांव, फोग, फोगेर, फोगेट, फोल्ग, फोल, फोर, फॉम, फोर्न,

फोर्त, फोर्स, फस्क, फोटो, फ्राकेज, फूग, फुज्यो, फुनेल, फूर, फार्मास, फुर्योज, फेब्रेर, अशा शब्दांमधूनच निजभाषेतील [$p^h$] जागा घेऊन [f] हे व्यंजन कोंकणीत आले.

एदवार्द जुझे ब्रून द सौज यांनी १९०५ या वर्षी 'Kristav Gharabo' ही कादंबरी लिहिली. १९११ साली प्रसिद्ध झालेल्या या कादंबरीत 'फ'च्या उच्चारासाठी त्यांनी सर्व ठिकाणी 'f'चा वापर केला आहे.

पोर्तुगीज भाषेने कोंकणी समाजात जी प्रतिष्ठा मिळविली, त्यामुळेच [$p^h$] जागा [f]ने घेतली असावी. आजच्या एका उदाहरणातून हे कसे घडले ते पाहता येते.

Stop, stand, skirt, school हे शब्द स्ट् आणि स्क या जोड व्यंजनांनी सुरू होतात. शब्दाच्या आरंभी जोडव्यंजन येणे ही गोष्ट कोंकणीच्या ध्वनि-व्यवस्थेत बसत नाही. म्हणून कोंकणी जिभेवर हे शब्द इश्टॉप/इस्टॉप, इश्टँड/इस्टँड, इस्कर्ट, इस्कूल असे येतात. 'इ' हा स्वर या जोडव्यंजनाला शब्दाच्या मध्य जागी ढकलतो. (इश्टॉप/इस्टॉप, इश्टँड/इस्टँड, इस्कर्ट, इस्कूल) अथवा त्यांना बाजूला काढतो. कोणताही कोंकणीभाषक हे शब्द अशाप्रकारे उच्चारतो, तेव्हा त्याचे इंग्रजी ध्वनिव्याकरण कच्चे असून कोंकणी ध्वनिव्याकरण पक्के असल्याचे किंवा त्याच्यावर कोंकणी व्याकरणाचा प्रभाव असल्याचे लक्षात येते. कोंकणी चांगली बोलता येण्यापेक्षा इंग्रजी चांगली बोलता येणे ही गोष्ट कोंकणी समाजात अधिक प्रतिष्ठेचे मानल्यामुळे कोंकणी बोलणारा खास प्रयत्न करून इंग्रजीकडून घेतलेले शब्द इंग्रजी व्याकरणासहित उच्चारण्याचा प्रयत्न करतो. असे करताना त्याच्याकडून अतिदुरुस्तीही केली जाते. 'इस्टेट'सारख्या मूळ इंग्रजी शब्दांत आरंभी इ असलेल्या शब्दाचाही कोंकणीभाषक 'स्टेट' असा उच्चार करतो.

प्रतिष्ठेच्या या व्याकरणामुळे ध्वनी आणि त्याच्या व्यवस्थेच्या नियमातही बदल घडतात. गुजराथीतही [$p^h$] हे व्यंजन आहे. आजचा मध्यमवयीन गुजराथी माणूस इंग्रजी बोलताना [f]च्या जागी बहुतांशी [$p^h$]चाच वापर करतो; परंतु आज ही परिस्थिती बदलत असल्याचे भाषावैज्ञानिक सांगतात. पंचवीस वर्षाच्या आतील वयाच्या युवकांच्या जिभेवर इंग्रजी बोलताना [f]च येतो. निज गुजराथी भाषेतून त्यांच्या जिभेवर [$p^h$]ची जागा [f] घेऊ लागल्याचे दिसत आहे. पुढच्या पंचवीस वर्षांत कदाचित गुजराथीत बहुधा [f]चाच उच्चार कानावर पडेल. कोंकणीप्रमाणेच काही बोलींमध्येच [$p^h$]अंग चोरून राहिलेले दिसेल. [ही माहिती अजय सर्वय्या (महाराजा सयाजीराव विद्यापीठ, बडोदरा) या भाषावैज्ञानिकाकडून मिळाली.] ■

मूळ लेख : माधवी सरदेसाय, ''कोंकणींतले म्हाप्राण आनी 'फ'चें उच्चारण''. 'जाग', जून २०१३,

**संदर्भसूची (कोंकणी, इंग्रजी या क्रमाने)**

आल्मैदा, मिगेल द० ''वनमाळ्यांचो मळो, खंड III'' Old Konkani Literature - The Portugues Role Ed० O०J०F० Gomes, Chandor-Goa, Konkani Sorospot Prakashan. 1999, 137-575.

Esteuao, Thomas, Dovtrina Christam em Lingoa Bramana Canarim (1622) दुसरी फोटो उजवाडणी. Mariano Saldanha(संपा०) Lisboa:Agencia Geral das Colonias, 1945.

De Souza, Eduardo Jose Bruno, Kristav Gharabo.Mumbai: Typographia Mariana. 1911.

Vocabulario da Lingoa Canarina Com Versam Portugueza. (संकलक, पाद्री दियोग रिबैर) Lisboa:Junta de Investigacoes do Ultramara, 1973.

शणै गोंयबाब (शणै व०र० वर्दे वालावलीकार). गोंयकारांची गोंयाभायली वसणूक. मुंबय छापखानो, 1928.

Almeida, Mathew. ''Aspects of Konkani - III : Aspiration in Konkani'' Buletin do Instituto Menezes Braganza, 174(1995) offprint (पानांक आकडे नात).

Bloomafield, Leonard. Language. New York : Henry Holt & Co० 1933.

Ghatage, A०M० Konkani of Sauth Kanara. A Survey of Marathi Dialects - 1 Bombay: The State Board for Literature and Culture, 1963.

...Cochin. A Survey of Marathi Dialects - IV. Bombay: The State Board of Literature and Culture, 1967.

Katre, S० M० The Formation of Konkani. Decen College Building & Silver Jublee Monograph Ser० 23. Poona : Deccan College, 1966.

Miranda Roky Valerine, "Synchronic and Historical Phnology of Six Konkani Dialects. "Ph०D० Diss. Comell Univ. 1971.

..."The Old Konkani Bharata Vol I : Introduction. Mysore: C०I०I०L०, 2011.292-327.

# वऱ्हाडी लोकभाषा आणि संस्कृत

- प्रतिमा इंगोले

['लोकभाषा आणि संस्कृत' या विषयावरील चर्चासत्रात भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे येथे दि. १९ एप्रिल २००५ला वाचलेला निबंध]

सध्याचा विदर्भ किंवा वऱ्हाड हा प्राचीन काळचा विदर्भ देश किंवा महाराष्ट्र होता. अर्थातच त्या काळी त्याची व्याप्ती मोठी, अख्खा महाराष्ट्र आणि आत्ताच्या महाराष्ट्राबाहेरही होती. विदर्भानदीकाठी असलेले कुंडीनपूर पूर्वी विदर्भपूर होते.

वीरपुरुषं तदेतद्वरदातट नामकं महाराष्ट्रम् ।
दक्षिणसरस्वती सा वहति विदर्भा नदी यत्र ॥

असे त्रिविक्रम भट्ट 'नलचंपू' ह्या ग्रंथात म्हणतात. ह्या महाराष्ट्राची आद्य लोकभाषा ज्यावेळी इथे प्राकृतिकधर्म अस्तित्वात होता, तेव्हा प्राकृत होती. तेव्हा इथे मातृसत्ताक पद्धती होती. आर्यांच्या आगमनानंतर इथे वैदिक संस्कृती रुजू लागली. आर्यांची बोलभाषा प्राकृतच होती. यज्ञात उपयोग करण्यासाठी व ऋचा रचण्यासाठी भाषेवर संस्कार करून केवळ धार्मिक उपयोगासाठी संस्कृत भाषा निर्माण केली गेली. ''संस्कृत ही आर्यांची धार्मिक भाषा असल्यामुळे तिला 'गीर्वाण' अथवा 'देववाणी' अशी अभिधाने प्राप्त झाली'' (देशमुख, १९६८). आर्यांची नित्योपयोगाची भाषा प्राकृतच होती. ''प्रगतीच्या कोणत्याही अवस्थेत अथवा काळात संस्कृत ही सामान्य लोकांची बोलभाषा नव्हती.'' (देशमुख, १९६८) आर्यांनी आणि अनार्यांनी सुद्धा केवळ ऋचा रचण्यासाठी ह्या भाषेचा उपयोग केला. गृत्समद, यम, यमी, लोपामुद्रा, आदी अनार्यच होते. प्राकृतिक धर्माची भाषा म्हणून प्राकृत हे जसे योग्य. संस्कारित केलेली भाषा म्हणून संस्कृत हेही तसे योग्यच. भारतातील देशीभाषा ह्या मूळच्या प्रकृतीतून निर्माण झालेल्या भाषा आहेत. म्हणून त्यांना देशी भाषा सुद्धा म्हणत होते. तत्पूर्वी केवळ भाषा म्हणत. प्राकृतालाच हेमचंद्र व्याकरणकार 'महाराष्ट्री प्राकृत' म्हणतो. अर्थात तेव्हा महाराष्ट्री अपभ्रंश अथवा जैन अपभ्रंश अशीही नावे प्राकृत भाषेसाठी वापरली गेली. हीच भाषा वऱ्हाडी भाषेचे आद्य रूप होय. तेव्हा संस्कृत केवळ साहित्याची भाषा होती.

भवभूतीच्या उत्तररामचरितात सीता प्राकृतात बोलते. पण तिची आई भूदेवी व कुलदेवता भागीरथी संस्कृतात बोलतात. कारण संस्कृत ही देवभाषा होती असे मानतात. संस्कृत नाटकातले सर्व विदूषक प्राकृतात बोलतात. विशाखादत्तच्या 'मुद्राराक्षस'मध्ये

वैश्य चंदनदासश्रेष्ठीही प्राकृतात बोलतो. ह्याचाच अर्थ फक्त श्रेष्ठींनाच संस्कृत बोलता येत होते. इतर प्राकृतात बोलत होते. म्हणजेच प्राकृत लोकभाषा होती. ती जनसामान्यांची व्यवहारभाषा होती. तिच्यापासून संस्कृत प्रमाणभाषा तयार केली गेली. श्रेष्ठींना जरी ती भाषा बोलण्याची परवानगी होती, तरी श्रेष्ठी ती भाषा बोलत नव्हते. उदा० : चंदनदास श्रेष्ठी. आता श्रेष्ठ शब्दही शेठपासून संस्करित केलेला शब्द आहे असा आपण विचार करीत नाही, तर श्रेष्ठापासूनच उत्पत्ती शोधतो.

'भुलाई' हा शब्द संस्कृत बाहु+ली, प्राकृत बहुली ह्या शब्दाचे वर्णविपर्यासाने भुल्लई=भुलाई असा बनलेला असावा असे मत पूर्वीचे अभ्यासक मांडत होते. ही व्युत्पत्ती म्हणजेही विपर्यास आहे. संस्कृत भाषेपासून मराठी भाषा निर्माण झाली ह्या चुकीच्या विचारसरणीमुळे प्रादेशिक भाषांच्या अभ्यासाची स्थिती विकृत होत गेली. लोकमानसातील 'महादेवाची भिलनी' नावाच्या लोकगीताच्या आधारे भुलाईची व्युत्पत्ती शोधता येते. महादेव रुसतो. पार्वती त्याला भिल्लिणीच्या रूपाने भुलविते अशी ही कथा. त्याआधारे भिल्लीणपासून भुल्लाई शब्द शोधता येतो. भिल्लीणबाई-भिल्लीबाई-भुल्लाबाई-भुल्लाई-भुलाई. एकदा असा विचार संमत केला की, लोकभाषेतून संस्कृत सिद्ध झाली हे पटते. मग 'भ्रष्ट'पासून भट शब्द शोधण्याची गरज पडत नाही. तर 'भट'पासून भाट व भ्रष्ट शब्द सिद्ध झाल्याचे दिसून येते.

प्रदेशावरून मराठीला नाव मिळाले, असे पूर्वापारचे मत आहे. महाराष्ट्री भाषा महाराष्ट्राची भाषा होती असे मानतात. महाराष्ट्र शब्दाची निर्मिती महा+राष्ट्र अशी झाली असे विद्वान सांगतात. पण ही संस्कृताधारे व्युत्पत्ती झाली. काही भाषापंडित त्या शब्दाचा शोध दाक्षिणात्य भाषांमध्ये घेतात. पण हा शोध देशीभाषेच्या आधारे घेता येतो. मातृसत्ताक पद्धतीत इथे गणराण्या होत्या. उदा० माहूरची रेणुका. मातापूर पासून माहूर शब्द सिद्ध झाला असे मानतात. माता शब्द मा शब्दापासून तयार झाला. म>पोषण करणे. ज>जन्म देणे. 'ज'चा उच्चार बरेचदा 'य' होतो. उदा० जव>यव देशी 'य'चे कालांतराने 'ह'मध्ये रूपांतर होते.

माजघर>मायघर>माहर>महूर

देशी शब्दांचे असे रूपांतर होऊ शकते.

बावली>बाहुली वयी>वही/कायनी>काहणी/डोव>डोह

वायरी - वाहरी माय>माह/माऊ(स्तन) मायू>मोह (झाड)(पोषण करणारे झाड)

शायनी - शहाणी पाय>पाह(णे) (चांदूमामा पाय)/ आहे>हाये

आयता - आहिता, बयीन - बहीण

शब्दकोशात 'हर'चा अर्थ कठीण, टणक असा दिला आहे, तर 'हार'चा अर्थ ओळ, रांग, माळ, असा दिला आहे. ह्याचा अर्थ पोषण करणाऱ्या अशा आठ

गणराण्यांचा ओळीने असणारा टणक प्रदेश असा आपण करू शकतो. ना० रा० शेंडे ह्यांच्या 'लोकसाहित्य संपदा' ह्या पुस्तकात पुढील ओळी आहेत.

'महाराठ देस्यामंदी, पिकाची कमती नाही
धानाचं पिक लई, उभ्या कपासीच्या रासी ।'
वो माहे गिरजाबाई (इथे 'माये'चे कालांतराने माहे होते.)

इथे 'महाराठ' देशामध्ये असा शब्दप्रयोग आला आहे. वऱ्हाडी भाषा प्राकृताचे कालांतराने चालत आलेले रूप आहे. अर्थात आपणास प्राकृतात आणि वऱ्हाडीत फरक जाणवेल. पण ते स्वाभाविक आहे. कारण आजची भाषा आपल्याला समजते; पण तिचे काही काळापूर्वीचे रूप आपल्याला समजणे कठीण जाते. कारण भाषेतील ध्वनी बदलत असतात. ते कधीही स्थिर नसतात. तेव्हा प्राकृताचे चालत आलेले भाषिक रूप आजही वऱ्हाडीत दिसते. काही शब्द जसेच्या तसे दिसतात. त्यातलाच 'महाराठ' हा शब्द आहे.

म+हारा+आठ = महाराठ

त्याचा अर्थ आठ महार गणराज्ये मिळून झालेला प्रदेश असाही होऊ शकतो. किंवा ते 'आर' शब्दाचेच बदललेले रूप हार असू शकते.

म+आर+आठ = महाराठ < मआराठ

कारण 'आहे'चे 'हाये' होते. म्हणजेच 'आ'चे 'हा' होण्याची वऱ्हाडी प्रक्रिया दिसते. आणि 'आर' म्हणजे चाकांचे आरे. म्हणजेच चाकांना जोडणारे भाग. ह्याअर्थी पोषण करणारे आठ भाग जोडणार म्हणून आरे. चाकांना जसे आरे जोडतात, तसेच आठ मातृगणांचा भाग जोडणारा आर. पुढे ह्याचे 'हार' झाले असावे. आठ मातृकांची कथा अथवा सात बहिणी व आठवा भाऊ अशा असंख्य लोककथा आहेत. सात बहिणींची आरती आत्ताही प्रचलीत आहे.

''आरती साता बयनीची । सात माय बयनी मिळाल्या
पान्यावरती गेल्या.. आरती सितामायची (वऱ्हाडी लोकगाथा)

सिंधू लिपीत 'आरे'चे चिन्ह ✲ असे आहे. आर म्हणजेच आरे - आणि आरचे हार म्हणजे जोडणारा - त्या अर्थी महारीमाय ही लोकदेवता आहे. तिचे पुढे मरीमाय झाले. ती पंचमहाभूतांपैकी तेजाची देवी आहे. 'महाराठी'चे पुढे मराठी झाले आहे. आठीपासून अष्टमी हा शब्द तयार केला. दिवाळीच्या पूर्वीच्या अष्टमीला 'आठी' म्हणतात. हा सृष्टीचा किंवा मातृपूजनाचा सण आहे.

पंढरपूरच्या शिलालेखात चौसष्ठीसाठी 'चौसठी' शब्द आला आहे. अष्टमी ही तिथी देवींच्या पूजेत महत्त्वाची मानतात. अष्टमीचे 'आठी'' हे रूपही महाराठी शब्दात असू शकते. म्हणजेच 'आठी'पासून 'अष्टमी'.

प्राचीन महाराष्ट्राचे सांस्कृतिक केंद्र वाशीम नगर होते. सातवाहन राजांनी





अनुक्रमणिका

पुरस्कारलेली भाषा तेव्हा सर्वदूर बोलली जात होती. तीच आद्य वऱ्हाडी होय. तिलाच देशी म्हणत होते. शिवकाळात तिच्यापासून प्रमाण मराठी भाषा बनली. तत्पूर्वी संस्कृत बनली. आपल्याला क्षितिज शब्दाचीही अशी व्युत्पत्ती शोधता येते. क्षितीजपासून सितीज नाही तर शितीज पासून क्षितीज शब्द तयार झाला असे म्हणता येते.

सिता = भुई

शित = धान्याचा कण-('शिता भरून भाताची परीक्षा')

शिव - शिवाराची मर्यादा

शेत - वावर - शेती - इथे शेतपासून क्षेत्र शब्द तयार होतो.

शितल - थंड - काळ्या मातीचा गुण - शेताचा गुण

शितामाता - पृथ्वीमाता - भूमीतत्व - सितामाता

ह्यावरून 'शि' शब्द भूमीची मर्यादा ह्याअर्थी लोकभाषेत वापरला जातो. वऱ्हाडीत शिवेला 'शि' म्हणतात. 'शिळी' ह्याअर्थी 'शि' शब्द वापरला जातो. ह्यावरून शितीज-पासून संस्कारित शब्द क्षितीज सिद्ध होतो.

शितीज > क्षितीज

प्राचीन भाषेचे हजारो वर्षे चालत आलेले स्वरूप ग्रामीण भाषेतच पहावयास मिळते. आणि खऱ्या अर्थाने तेच अविकृत आणि शुद्ध रूप होय. मराठीच्या अभ्यासकांनी ह्या दृष्टीने वऱ्हाडीचा अभ्यास करायला हवा. कारण वऱ्हाडी बोलीही आता बदलते आहे. 'वऱ्हाडी' हे नाव ह्या भाषेला पुन्हा नंतर प्रदेशावरून पडले आहे. कारण मराठीचे तान्हे रूप वऱ्हाडी आहे. पण मराठी हे नाव प्रमाणभाषेने स्वीकारल्यामुळे चालत आलेल्या त्याच भाषेला वऱ्हाडी हे नाव पडले. विदर्भपूरवरून विदर्भ देश हे नाव महाराष्ट्रासारख्या तेव्हाच्या विशाल भूभागाला पडले होते. पण 'वरदातट'पासून 'वऱ्हाड'पेक्षाही 'वहराड'पासून वऱ्हाड नाव आले असावे.

वोहर = वहर > वधूवर          वहर + आड = वऱ्हाड

वऱ्हाड कारण कृष्णाने रुक्मिणीला आडमार्गाने नेले असे वऱ्हाडकरांना अद्यापही वाटत असावे. आडवाट > आडरान > आडगाव > आडमार्ग > आडरस्ता > आडनाव ह्याअर्थी 'आड' शब्द कितीतरी शब्दांमध्ये आहे. वऱ्हाडीत छोट्या विहिरीला 'आड' म्हणतात. छोटी वाट म्हणजे आडवाट म्हणजेच पाऊलवाट. त्याअर्थीही पूर्वीचा मोठा प्रदेश आता छोटा झाला म्हणूनही 'आड' शब्द आला असावा. पण रुक्मिणीशी संबंधित ओव्यांमध्ये 'वऱ्हाड' शब्द आवर्जून येतो. आता नवरदेवाकडच्या मंडळींना विदर्भात 'वऱ्हाड' म्हणतात. वऱ्हाडे आडनावही विदर्भात आहे. इथे मात्र आडनाव म्हणजे कुलनाम.

'आमुच्या वऱ्हाडात सोन्याचा भुईपाट रुखमी पाहे वाट'

किंवा तो महादेव व गिरजा संबंधात अनेक ओव्यांमध्ये दिसतो

(१) 'गिरजा असून गोंडीन ठेवली, दोन बायकांची चाल वऱ्हाडी लावली.'
(अर्थात ही गोंडीन म्हणजे भिल्लीण)

(२) 'महादेवाले लागलं पान गोट्याच्या गराळात/शायनी पाराबती पत्र पाठोते वऱ्हाडात.'

वेदातील शब्दांचे विदर्भातील ग्रामीण भाषेतील शब्दांशी बरेच साम्य आहे. वऱ्हाडीच्या प्राचीन भाषेतील बऱ्याच शब्दांशी संस्कृतचे साम्य आहे. ह्या ग्रामीण भाषेचे महत्त्व सहासात हजार वर्षांपासून सातत्याने चालत आलेल्या प्राकृत भाषेचे स्वरूप असल्यामुळे फार आहे. त्यातून भारताच्या प्राचीनतम इतिहासाचे व भाषेच्या मूळ स्वरूपाचे दर्शन होते. वऱ्हाडी भाषेतील शब्द अन्वर्थक, समर्पक, व्युत्पत्तीस धरून इतर बोलभाषांतीलच नव्हे, तर इन्डोजर्म्यानिक धात्वर्थाशी समानता दाखविणारे आहेत.

खासर = ख+आ+सर = ख = आकाश सर = चालणे
= अधांतरी चालणारा गाडा
रेंघी = रंह = गतीने चालणारी लहान गाडी
दाता = दंत = नांगराला फाळ लावतात तो भाग
माथन = मथ = घुसळणे = घुसळण्याचे भांडे
उंडे = उंड = गोळा, भाग
जोहळा = यवडा = निकृष्ट यव (ज पासून य)
जूं = युज = बैल ज्याला जोडतात ते साधन
इंगुळ = अंगार = निखारा

ह्याचा अर्थ भाषेच्या मूळ प्रकृतीचे दर्शन वऱ्हाडी भाषेत होते आणि तिच्यापासून संस्कृत आणि मराठी काही विवक्षित हेतूने वेगळ्या केलेल्या भाषा आहेत हे दिसून येते. वऱ्हाडी भाषेतील आणखी एक शब्द पाहू : उ+म+बी = उमबी = ओम्बी = उम्बई

उ = रक्षण करणे    म = पोषण करणे    बी = जे उगवते ते

'बी'चा अर्थ द्विदल धान्य असावा. कारण एकदल धान्याला ब चा मूळ 'व' शब्द वापरतात. संस्कृतात असणारी रूपे ह्या 'बी'ची आहेत. बा, बे, बी पासून द्वा, द्वे, द्वी ही रूपे तयार होतात. मुळात इथे 'व'चा 'ब' झाला आहे. द्वा मध्ये तो कायम आहे. 'बी'ला जन्मत्वदर्शक 'ज' लागून बीज शब्द तयार होतो. 'बी' आणि 'बीज'चा अर्थ एकच आहे. पण 'बीज'पासून तयार होणाऱ्या 'वीर्य' शब्दाचा अर्थ वेगळा आहे. अर्थातच 'वीर्य'पासून 'बी' शब्द तयार झालेला नाही. तर 'बी'पासून 'वीर्य' तयार झाला आहे. 'बी'चे मूळ रूप 'बी' आणि 'ज'चा 'य' वापरून 'वीर्य' शब्द. 'वी' आणि 'बी' एकाच अर्थाचे शब्द आहेत. सिंधुलिपीत 'व'साठी एक रेघ आणि 'वी'साठी दोन रेघा वापरतात. 'वा'चा उच्चार 'बा' होऊन दोन म्हणून तो प्रचलित झाला.

उदा० बा+शिंग = बाशिंग    बा+आरा = बारा

आता द्वादशपासून बारा शब्द तयार होत नाही. कारण दहा अधिक दोन म्हणजे द्वादश आणि 'आरा' म्हणजे सहा. दोन आरा म्हणजे बारा. आता एकदल धान्यासाठी 'व' आणि जन्मत्वदर्शक 'ज' मिळून 'जव' शब्द होतो. संस्कृतात ह्याचेच 'यव' होते; तर त्याला 'आर' लागून 'जवारी' हा शब्द तयार होतो. ह्यालाच जोहळा, गोंधळा म्हणतात. 'उ' म्हणजे रक्षण करणे आणि 'म' म्हणजे पोषण करणेपासून 'माऊ' हा वऱ्हाडी शब्द तयार होतो. त्याचा अर्थ स्तन. ह्याचेच 'माव', 'माऊली', 'माय' असे रूपांतर होते. 'उमा' म्हणजे पोषण करणारी व रक्षण करणारीही. वेदातील 'ओमासः' (१-३-७) हा शब्द उ+मा पासूनच सिद्ध करण्यात आला आहे.

वऱ्हाडी स्त्रिया पुरुषांच्या सारख्या प्रथमपुरुषी बोलतात. 'मी जातो', 'मी करतो' म्हणतात. संस्कृतातही असेच आढळून येते. स्त्रिया पुंलिंगी बोलतात. वऱ्हाडीत 'ण' हे व्यंजन नाही. पाण्यासाठी 'पानी' शब्द वापरतात. संस्कृतात 'पानीय' वापरतात. संस्कृताप्रमाणे 'मी'साठी 'मियाँ' किंवा 'म्या' वापरतात. तसाही संस्कृतचा उच्चार वऱ्हाडीसारखा आहे. पण वऱ्हाडीत संस्कृतपेक्षा विपुल शब्द आहेत. वऱ्हाडीत उच्चारसौकर्य आहे. सुलभता आहे, तर संस्कृतमध्ये जटिलता आहे. ही जटिलता कृत्रिम वाटते. त्यामुळेच ती मुद्दाम निर्माण केल्यासारखी वाटते. कारण भाषेची प्रक्रिया सुलभीकरणाकडे असते. उदा० 'मेळजानारो' गावाचे मेयजानोरी आणि नंतर मेजानोरी होते. उपसर्ग बदलले की संस्कृतात अर्थ बदलतात. त्यामुळे वऱ्हाडीपासून संस्कृत हेच योग्य आहे. केवळ ग्रंथव्यवहारासाठी जर संस्कृत वापरली जात होती, तर त्या काळातील बहुतांश संस्कृत ग्रंथही विदर्भातच निर्माण झाले असावेत. गुणाढ्याचा 'बृहत्कथा', वात्सायनमुनींचे 'कामसूत्र', यशोधराची टीका 'जयमंगल', भास्कराचार्यांचा 'सिद्धांत शिरोमणी', सम्राट सर्वसेनाचा 'हरिविजय' इ० कितीतरी ग्रंथ विदर्भात लिहिले गेले आहेत. एवढेच नव्हे तर ऋग्वेद सर्वात प्राचीन ग्रंथ मानला जातो. ह्या ग्रंथाचे दुसरे मंडळ सर्वात प्राचीन असून त्यापासूनच ऋग्वेदाची सुरुवात मानली जाते. ह्या ऋग्वेदातील दुसऱ्या मंडळाचा रचयिता गृत्समद ऋषी विदर्भातील आहे. ह्याचाच अर्थ प्राक्प्राचीन काळातील व प्राचीन काळातील बऱ्याच ग्रंथांची निर्मिती विदर्भातच झाली आहे. साहजिकच त्या परिसराचा, त्या परिसरातील बोलीभाषेचा, त्या परिसरातील परंपरांचा प्रभाव ह्या निर्मितीवर पडणे अपरिहार्य आहे. फक्त ह्या दृष्टिकोनातून अद्याप अभ्यास केला गेलेला नाही. ह्या दृष्टीने वऱ्हाडी लोकभाषेचा नव्याने अभ्यास होणे आवश्यक आहे. ■

**संदर्भ :**

(१) देशमुख, प्र०रा०, १९६८. 'मराठी भाषा का जगवावी?' 'नवभारत', ऑगस्ट.
(२) पाटील, शरद, १९८८. संपादकीय. 'सत्यशोधक मार्क्सवादी', सप्टेंबर-ऑक्टोबर.





अनुक्रमणिका

# बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास : एक विवेचन

- सोनल कुलकर्णी-जोशी

एकोणिसाव्या शतकात युरोपमधील भाषाभ्यासकांनी भाषेतील ध्वनि-बदलाच्या संदर्भात काही निरीक्षणे नोंदवली. त्यातील एक महत्त्वाचे निरीक्षण असे की ध्वनि-बदल नियमित/नियमबद्ध असतात. ध्वनि-बदलाच्या प्रक्रियेत विशिष्ट ध्वनींच्या सान्निध्यात एखादा ध्वनि-बदल एकाच वेळी भाषेतील संपूर्ण शब्दसंग्रहाला प्रभावित करतो. या ध्वनि-बदलांना अपवाद असू शकत नाहीत; पण प्रत्यक्षात असे आढळून येते की एकच भाषा बोलणाऱ्या प्रदेशात त्याच भाषेच्या वापरामध्ये वैविध्य असते. हे वैविध्य केवळ ध्वनि-स्तरावरच नव्हे; तर इतर भाषिक स्तरांवरही असू शकते. १८६०च्या दरम्यान काही जर्मन व फ्रेंच अभ्यासकांनी दाखवून दिले की या वैविध्याचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करणे शक्य आहे. अशा प्रयत्नांतून निर्माण झालेल्या भाषाभ्यासाच्या पद्धतीला 'डायलेक्टॉलॉजी' म्हणजेच बोलीभाषाभ्यास असे नाव मिळाले. एका प्रदेशातच नव्हे तर एकाच समाजात एकाच भाषेच्या वापरात विविधता असते आणि ती अभ्यासयोग्य असते हे पुढे सामाजिक भाषाभ्यासकांनीही दाखवून दिले.

भाषेचा शास्त्रशुद्ध अभ्यास - मग तो सैद्धांतिक दृष्टिकोनातून असो वा उपयोजित - करत असताना त्या भाषेचे व तिच्या बोलींचे परिपूर्ण/सम्यक असे वर्णन हाताशी असणे ही भाषाभ्यासाची मूलभूत गरज आहे. प्रस्तुत लेखात आपण मराठी बोलीभाषाभ्यासाचा विचार करणार आहोत.

मराठीचे भौगोलिक क्षेत्र निश्चित करायचे झाल्यास १९५६ व १९६०च्या भाषावार प्रांतरचनेनंतर अस्तित्वात आलेल्या गुजरात, मध्यप्रदेश, छत्तीसगड, आंध्र प्रदेश, कर्नाटक आणि गोवा यांच्यामधला भूप्रदेश हा मराठी भाषिक प्रदेश म्हणून ओळखला जाऊ लागला. १९५६च्या आधी मराठीचा भौगोलिक विस्तार यापेक्षा मोठा होता. महाराष्ट्रातील खानदेश, मराठवाडा, विदर्भ देश, कोकण असे प्रमुख मराठी भाषिक प्रदेश म्हणून ओळखले जातात. या प्रत्येक प्रदेशाची विशिष्ट अशी बोली आहे. शेजारी राज्यांतील प्रचलित भाषांचा या मराठी बोलींवर परिणाम झाल्याचे दिसून येते. या अनेक बोलींपैकी एकेका बोलीवर केंद्रित असे अभ्यासपर लेख, प्रबंध आणि पुस्तके लिहिली गेली आहेत. काही लेखांचे प्रकाशन 'भाषा आणि जीवन'मध्येही झाले आहे. पण मराठी बोलींचा एकत्र आणि व्यापक अभ्यास करणाऱ्या चार प्रमुख प्रयत्नांचा उल्लेख करता येईल :

(१) जॉर्ज ग्रियर्सन, १९०६. भारताचे भाषिक सर्वेक्षण (लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडियां) खंड ७. मराठी बोलींच्या या सर्वेक्षणात फक्त कोकणीला मराठीच्या बोलीचा दर्जा दिला आहे. सीमा भागातील अनेक भाषाप्रकारांची नोंद इथे 'ब्रोकन डायलेक्ट्स' अशी केली आहे.

(२) डॉ० अ०म० घाटगे, १९६० आणि १९७०च्या दशकांत डेक्कन कॉलेज, पुणे तर्फे प्रकाशित झालेले 'मराठीच्या बोलीभाषा' (डायलेक्ट्स् ऑफ मराठी) ही पुस्तिकांची शृंखला. या अंतर्गत महाराष्ट्रातील कोकणीचे पोट प्रकार आणि द्रविडी प्रांतांत स्थलांतरित झालेल्या मराठी भाषकांच्या बोलींचा अभ्यास केला आहे.

(३) डॉ० र०वा० धोंगडे, २०१३ मध्ये राज्य मराठी विकास संस्था मुंबई तर्फे प्रकाशित 'महाराष्ट्राचा भाषिक नकाशा : पूर्वतयारी' या पुस्तकात मराठीच्या प्रमुख प्रादेशिक प्रकारांतील शब्दसंग्रह विचारात घेतले आहेत.

(४) अरुण जाखडे संपादित, २०१३, पद्मगंधा प्रकाशनाचे 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण', यातील महाराष्ट्र-संबंधित खंड.

**बोलीभाषाभ्यासाची पद्धती :**

बोलीभाषांच्या-सर्वेक्षणाच्या दर्जाचा सर्वेक्षणांतर्गत गोळा केलेल्या भाषासामग्रीशी थेट संबंध असतो. म्हणूनच सर्वेक्षणात सामग्रीसंकलक म्हणून सहज उपलब्ध असणाऱ्या व्यक्तींवर (उदा० सरकारी शाळांतील शिक्षक, हौशी कार्यकर्ते, इ०) पूर्णपणे अवलंबून राहणे योग्य नाही. सामग्रीसंकलनासाठी निवडलेल्या व्यक्तींना आवश्यक ती भाषावैज्ञानिक पार्श्वभूमी असणे अत्यंत गरजेचे आहे.

एखाद्या भाषाप्रकाराचे स्वतंत्र बोली म्हणून अस्तित्व सिद्ध करण्यासाठी संशोधकाला प्रत्यक्ष हाती आलेल्या भाषिक सामग्रीवरच अवलंबून राहावे लागते. किंबहुना 'भाषा' आणि 'बोली' या केवळ भाषावैज्ञानिक संज्ञा नसून त्यांचे स्वरूप राजकीय, सामाजिक, ऐतिहासिक इ० घटकांच्या संदर्भातच निश्चित केले जाते असे सामाजिक भाषावैज्ञानिकांनी दाखवून दिले आहे.

बोली-अभ्यासासाठी हाती घेतलेल्या क्षेत्रपाहणीचे उद्दिष्ट हे त्या बोलीतील शब्दांचे संकलन आणि तिच्या व्याकरणाचे वर्णन यांच्याशी निगडित असते. इथे व्याकरण या शब्दाचा अर्थ बोलीतील ध्वनी, शब्द, वाक्य व अर्थ तयार होण्याच्या प्रक्रियांचे वर्णन असा घ्यांवयाचा आहे.

भाषिक सामग्रीचा 'अस्सलपणा' राखणे ही अभ्यासकाची पुढील जबाबदारी असते. यासाठी सर्वेक्षणात सामावून घेतलेले भाषक हे सर्व दृष्टींनी प्रातिनिधिक (सामाजिक वर्ग, वयोगट, लिंग इ०) असतील याची काळजी घेतली पाहिजे. (पाहा : कुलकर्णी-जोशी

२००९.) भाषिक समाजात प्रवेश मिळवल्यानंतर निवडलेल्या भाषकांशी संवेदनशीलपणे योग्य 'नाते' निर्माण करणे, संशोधनाचे उद्दिष्ट कायम डोळ्यासमोर ठेवून भाषकांची प्रकल्पातील गुंतवणूक वाढवणे, केवळ 'माहिती पुरवणारे' म्हणून नव्हे, तर सहसंशोधकाचा दर्जा देऊन प्रकल्पात सामावून घेणे हे संशोधनाचा अस्सलपणा टिकवण्यासाठी हिताचे ठरते.

प्रत्यक्ष क्षेत्रपाहणीची सुरुवात करण्यापूर्वी योग्य ती पूर्वतयारी करावी लागते. म्हणजे उपलब्ध साहित्याचा अभ्यास, विशिष्ट अर्थ-क्षेत्रांशी संबंधित शब्दावली, प्रश्नावली, खुल्या चर्चेसाठी विषयांची निवड, लोकगीते व लोककथांचा परिचय, व तांत्रिक साधनांची निवड व त्यांच्या वापराचा सराव, इ० गोष्टींचा अंतर्भाव पूर्वतयारीत होत असतो.

क्षेत्रपाहणी दरम्यान प्रमाण-भाषक संशोधकाने बोली-भाषकाकडून माहिती घेत असताना काही पथ्ये पाळणे आवश्यक असते. थेट प्रश्न विचारून माहिती गोळा करण्यापेक्षा थोडे कसब वापरून, वस्तूंकडे निर्देश करून, चित्रांच्या माध्यमातून, संभाषणातून किंवा प्रसंग-कथनातून माहिती गोळा करणे जास्त उपयुक्त ठरते. ''तुम्ही डोक्याला काय म्हणता?'' असा थेट प्रश्न विचारला तर 'डोस्कं', 'टकुरं' किंवा 'टाळकं' असे बोलीभाषेतले शब्द उत्तर म्हणून येण्याऐवजी प्रमाण मराठीशी परिचित बोलीभाषक 'डोकं' असंच उत्तर देण्याची शक्यता जास्त असते. नैसर्गिक परिस्थितीत सहज भाषावापराचे निरीक्षण करून अशा प्रकारे मिळवलेल्या माहितीचा अस्सलपणा पडताळून पाहता येतो. डिजिटल स्वरूपात गोळा केलेली दृक्-श्राव्य सामग्री सी०डी०/ डी०व्ही०डी०, क्लाउड, गुगलड्राइव्ह इ० माध्यमांत पुढील अभ्यासासाठी जतन करून ठेवता येते व इतर अभ्यासकांनाही सहज उपलब्ध करून देता येते.

सामग्री-संकलनानंतर पुढचा महत्त्वाचा टप्पा म्हणजे मिळालेल्या माहितीचे विश्लेषण. संपादित सामग्रीचे वर्गीकरण, आकडेवारी, ग्राफ (आकृती)च्या स्वरूपात प्रस्तुतीकरण, बोलींचा तुलनात्मक अभ्यास इ०साठी योग्य अशा संगणकीय आज्ञावलींचा (प्रोग्रॅम्सचा) वापर करणे व्यवहार्य ठरते. भाषिक सामग्रीच्या प्रस्तुतीकरणासाठी टूलबॉक्स्, इलॅन, फ्लेक्स्सारखे सॉफ्टवेअर सध्या उपलब्ध आहेत. भाषेच्या अनेक बोलींच्या सर्वेक्षणातून हाती येणारी सामग्री/ माहिती अर्थातच खूप विस्तृत व गुंतागुंतीची असते. अशा सामग्रीचे प्रस्तुतीकरण करताना भाषिक नकाशांचा (डायलेक्ट ॲटलसचा) वापर करण्याची पद्धत प्रचलित आहे. त्यामुळे क्लिष्ट माहितीही सुलभ स्वरूपात दृश्यमान होते व तिचे आकलन करणे सोपे जाते. अशा नकाशांमध्ये प्रत्येक भाषिक विशेषाचा प्रसार 'आयसोग्लॉस' (समभाषा वापर दाखवणारी रेखा)च्या स्वरूपात केला जातो. अशा प्रस्तुतीकरणामुळे कोणत्याही भाषिक विशेषांच्या भौगोलिक मर्यादा पटकन लक्षात येतात.

अपरिहार्य अशा जागतिकीकरणाच्या संदर्भात आणि भाषा ही स्वभावतःच प्रवाही

असल्याने बोलीभाषांच्या स्वरूपातही काळानुसार बदल होत जाणे स्वाभाविक आहे. म्हणून लेखाच्या शेवटी असे सुचवावेसे वाटते की कुठल्याही भाषेच्या बोलींचे सर्वेक्षण व दस्तऐवजीकरण हे वेळोवेळी व पुन:पुन: होणे गरजेचे आहे.

■

संदर्भ :


(१) कालेलकर, ना०गो० १९८५. भाषा : इतिहास आणि भूगोल, मौज प्रकाशन.

(२) कुलकर्णी-जोशी, सोनल. २००९ (दिवाळी) 'सामाजिक भाषा-शास्त्रातील संख्यात्मक संशोधन पद्धती.' भाषा आणि जीवन.


### ओळख

बांधिलकी २०१३-१४

भाग १ व २

देवळा (जि० नाशिक) येथील कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांचा वार्षिक अंक नेहमीच वैशिष्ट्यपूर्ण असतो. मराठी अभ्यास परिषदेने आपल्या रौप्यमहोत्सवी वर्षात घेतलेल्या महाविद्यालयीन वार्षिकांक स्पर्धेतही त्याला प्रथम पारितोषिक मिळाले होते. ग्रामीण जीवनाशी संबंधित असा एखादा विषय निवडून त्यावर विद्यार्थ्यांकडून लिहून घेतलेल्या लेखांचा त्यात समावेश असतो. या वर्षी त्यांनी 'ग्रामशोध' हा विषय निवडून तो दोन भागांत प्रसिद्ध केला आहे.

विद्यार्थ्यांनी आपल्या गावाची आपणच पाहणी करावी अशी या अंकाची कल्पना आहे. गावाचा इतिहास, भूगोल, संस्कृती, राजकारण आणि वर्तमान लोकसमूहमानस यांचा शोध घेऊन त्याबद्दल या अंकात लिहिले आहे. पहिल्या भागात समग्र गावाचे आकलन मांडण्यात आले आहे तर दुसऱ्या भागात गावातील स्त्रीजीवनाच्या पाहणीचा अहवाल आहे. विद्यार्थ्यांकडून आपल्या भोवतीच्या जीवनाचा शोध घेऊन त्यावर लेखन करून घेण्याचा हा प्रयत्न स्तुत्य व अनुकरणीय आहे. यात सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांना हा अनुभव त्यांच्या पुढील आयुष्यांत उपयोगी ठरेल, हे नि:संशय.

# पैसाअडका!

- अरविंद कोल्हटकर

'पैसाअडका' ह्या रोजच्या वापरातील शब्दप्रयोगातील 'अडका' म्हणजे काय असा विचार मनात आला आणि त्या अनुषंगाने थोडा शोध घेतला तेव्हा 'एकातून दुसरे' अशा प्रकाराने पुढील यादी आणि त्यातील तपशील गोळा झाले. मराठी भाषेमध्ये पैसा-द्रव्य ह्या संदर्भात कोणकोणत्या नाण्यांची नावे सापडतात आणि त्यांची उपपत्ती, ते ते शब्द वापरात असताना त्यांचे मूल्य काय होते या संबंधीची ही टिप्पणी आहे. ती तयार करताना मोल्सवर्थसंपादित 'मराठीचा कोष', दाते-कर्वेसंपादित 'महाराष्ट्र शब्दकोष', तुळपुळे-फेल्डहाऊससंपादित 'जुन्या मराठीचा कोष', हेन्री यूलसंपादित हॉब्सन-जॉब्सन कोष, मोनिअर-विल्यम्स आणि आपटे ह्यांचे संस्कृत-इंग्रजी कोष, चतुर्वेदी संपादित 'हिंदी-इंग्रजी कोष' ह्या साधनांचा उपयोग केला आहे. येथे हे स्पष्ट करतो की, प्राचीन वा मध्ययुगीन भारतातील नाण्यांचा इतिहास येथे संकलित करण्याचा प्रयत्न केलेला नाही. तो विषय खूपच विस्तृत आहे. येथे केवळ मराठी भाषेत नाणेदर्शक शब्द काय होते या विषयीची माहिती संकलित केली आहे.

मिळालेली माहिती पुढीलप्रमाणे मांडली आहे : प्रथम शब्द, नंतर सारांशरूपात कोषात सापडलेली माहिती आणि उदाहरणे आणि कंसात कोषाचे संक्षिप्त नाव. अखेरीस कंसात माझी स्वत:ची - असल्यास - काही टिप्पणी अशी ही मांडणी आहे.

ह्या माहितीमध्ये अंकगणिती सुसूत्रता शोधण्यात अर्थ नाही. येथील कोष्टके एकाच नाणेवाचक शब्दाची वेगवेगळी मूल्ये दर्शवितांना आढळतील. ह्याचे कारण असे आहे की एकच शब्द गेल्या हजार-बाराशे वर्षांत स्थलकालपरत्वे वेगवेगळ्या मूल्यांचे दर्शन करविण्यासाठी वापरला गेला आहे, जसे की आजच्या पैसा आणि १९५७ पूर्वीचा पैसा ह्यांचे मूल्य एकच नाही आणि त्यामुळे १ रुपया म्हणजे ६४ पैसे आणि १ रुपया म्हणजे १०० पैसे हे दोनही अर्थ कालपरत्वे संभवतात. त्याच कारणामुळे माहिती संग्रहित करताना लहानापासून मोठ्याकडे वा मोठ्याकडून लहानाकडे अशी काही शिस्तशीर व्यवस्था लावता आलेली नाही. शक्य झाले तसे लहान नाणी सुरुवातीस आणि मोठी शेवटाकडे असे मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

'पैसाअडका'मधील 'अडका'पासून प्रारंभ करू.

अडका-अडिका-अटका-१/२ रुका, एक तांब्याचे नाणे. 'अटक्याची कोंबडी आणि

टका फळणावळ', 'हातीं नाहीं अडका, बाजारांत चालला धडका' (मोल्सवर्थ). १/२ रुका, रुक्क्याचा चतुर्थांश, पै, आण्याचा बारावा भाग. 'शिष्यास न लाविती साधन, न करविती इंद्रिये दमन। ऐसे गुरु अडक्याचे तीन, मिळाले तरी त्यजावे॥' (दाते-कर्वे.) एक प्रकारचे नाणे, 'अडिका तेलालागी दिधला' लीळाचरित्र (तुळपुळे.) (अशा रीतीने 'पैसाअडका' हा 'पैसा' अशा अर्थाचा द्विरुक्त शब्द दिसतो, जसे की 'भाईबंद', 'नोकरचाकर', 'मालमत्ता', 'दागदागिने', 'सरदारदरकदार' इत्यादी. मोल्सवर्थमधील 'फळणावळ' म्हणजे कोंबडी फळविण्यासाठी आणलेल्या कोंबड्याचा दर.)

रुका, रुक्का-१/१२ आणा. (मोल्सवर्थ). १६ आणे किमतीचे चांदीचे नाणे, पै, आण्याचा बारावा भाग. (दाते-कर्वे.)

विसवा, विश्वा-१/२० रुका. (मोल्सवर्थ.)

पैका-१/४ रुका, १/१२ शिवराई. (मोल्सवर्थ.) म्हणजेच १/२ अडका. (मोल्सवर्थ.) 'स्त्री सुत बंधू पैका उचकी.' (दाते-कर्वे.) (बाईचं ऐका, गाडीभर पैका.)

टका- (१) १६ शिवराई, (२) ४ पैसे, (३) १ आणा, (४) उत्तर हिंदुस्तानात २ पैसे, (५) गुजरातमध्ये ३ पैसे.

(दाते-कर्वे.) तसेच 'घरटका' घरावर कर, 'लग्नटका' लग्नावर कर. (मोल्सवर्थ.) उत्तर हिंदुस्तानात दोन पैसे, चांदीचे नाणे. (चतुर्वेदी.) ('अंधेर नगरी चौपट राजा, टका सेर आटा टका सेर खाजा' - अंधेर नगरीत विचित्र राज्य, आटा आणि मिठाई, दोन्हीचा भाव सारखाच - शेराला एक टका. 'सब घोडे बारा टके'-सगळे घोडे एकाच किमतीचे-बारा टके, one size fits all. सोनटक्का = सोन्याचे नाणे. मूळ संस्कृत 'टङ्क', ठसा उठवून केलेले नाणे, a punch-marked coin. त्यावरून 'टङ्कशाला' टांगसाळ. बंगाली भाषेत টাকা (टाका) हे बोलीभाषेतील रुपयाचे नाव असून बांगला-देशाच्या चलनाचेही तेच नाव आहे.)

ढबू-ढब्बू, ढबू पैसा - (१) दोन पैसे किमतीचे तांब्याचे नाणे. (२) दोन शिवराई. देखण्यांत ढब्बू चालण्यांत शिवराई.' (मोल्सवर्थ आणि दाते-कर्वे.)

सजगाणी - एका ढबूचे नाणे. 'सजगाणीस देई रुका', नामदेव गाथा. (तुळपुळे.)

शिवराई - १ पैसा, शिवाजीने राज्याभिषेकप्रसंगी पाडलेले तांब्याचे नाणे, किंमत अर्धा ढबू पैसा. (मोल्सवर्थ.)

काकण-काकिणी = २० कवड्या अथवा कपर्दिका. (कर्वे-दाते.) काकणभर सरस=थोड्या फरकानेच सरस.

कवडी, कपर्दिका, कपर्दिक, कपर्दक, वराटिका - छोट्या नाण्यासारखी वापरली जाणारी कवडी. (मोल्सवर्थ.) - 'पैं दृष्टादृष्टाचिये जोडी । भांडवला न सुटे कवडी ॥' ज्ञानेश्वरी.

९.५०३. (तुळपुळे) ''c. 1665. ''The other small money consists of shells called Cowries, which have the edges inverted, and they are not found in any other part of the world save only the Maldive Islands... Close to the sea they give upto 80 for the paisa, and that diminishes as you leave the sea, on account of carriage; so that at Agra you receive but 50 or 55 for the paisa. Tavernier''(हॉब्सन-जॉब्सन.)

कोष्टक : २८ कवड्या = १ बोरी, १२ बोरी = १ दुगाणी, १२ दुगाणी = १ रुपया. म्हणून २८८० कवड्या = १ रुपया. (हॉबसन-जॉबसन). (ह्यावरून शब्दप्रयोग - एक कपर्दिक म्हणजे अगदी क्षुल्लक रक्कम. देवदर्शन पुराणी । काया कष्टवी जे गोसेवनी । तयातें न लगे कपर्दिक दानी । तपें करूनि मी तोषे ।। (अधिकमाससमाहात्म्य - khapre.in येथून.) कवडीचुंबक म्हणजे चिक्कू माणूस. जवळ फुटकी कवडीही नसणे म्हणजे अतिदारिद्र्य. कोष्टक : २०कवड्या = १ काकिणी, ४ काकिणी = १ पण, १६ पण = १ द्रम्म, १६ द्रम्म = १ निष्क.

खुळापैसा - राजापूर भागात प्रचलित असलेले एक तांब्याचे नाणे, रुपयाचा १/७०० वा भाग. कवडीबरोबरचे. (मोल्सवर्थ.)

दाम-पैसा, किंमत, १/३० किंवा १/६० आणे. (मोल्सवर्थ). एक जुने तांब्याचे नाणे, नंतरच्या काळात वापरातून बाहेर पडले; पण हिशेबाच्या सोईसाठी चालू राहिले. अकबराच्या काळात १ रुपया म्हणजे ४० दाम, औरंगजेबाच्या वेळी ४६ अधिक १/३ दाम. उत्तर हिंदुस्तानात सर्वसाधारणपणे २५, ३० वा ६० दाम असे मानत. 'राजा करी तैसे दाम, चाम तेहि चालती.' (दाते-कर्वे.) 'नामा म्हणे तुमचे घरीं सोनें दाम। आमुचे घरीं तुमचें नाम ।।' नामदेवाची गाथा १७३९. (तुळपुळे.) दामदुप्पट म्हणजे व्याजासह मुद्दल दुप्पट होणे. दामदुपटीपलीकडे व्याजाची आकारणी हिंदू धर्मशास्त्रानुसार निषिद्ध होती. (दाते-कर्वे.) तीन दाम म्हणजे एक दमडी, सहा दाम म्हणजे एक तुकडा आणि साडेबारा दामाचा एक अधेला. (चतुर्वेदी.)

Originally an actual copper coin, regarding which we find the following in the Ain, i. 31, ed. Blochamann : "1. The Dam weighs 5 tanks, i.e. 1 tolah, 8 mashas, and 7 surkhs; it is the fortieth part of a rupee. At first this coin was called Paisah, and also Bahloli; now it is known under this name (dam). On one side the place is given where it was struck, on the other the date. For the purpose of calculation. The dam is divided into 25 parts, each of which is called a jetal. This imaginary division is only used by accountants. The adhelah is half of a dam. The paulah

is a quarter of a dam. The damri is an eighth of a dam." (हॉबसन-जॉबसन.) येथेच 'दाम' आणि 'दमडी' ह्यावर अजूनही मजेदार तपशील नोंदविलेले आहेत. उदा० अवध प्रांतातले कोष्टक : 26 kauris=1 damri, 1 damri=3 dam, 20 damri=1 ana, 25 dam=1 pice. तसेच 1628. -- "The revenue of all the territories under the Emperors of Delhi amounts, according to the Royal registers, to 6 arbs and 30 krors of dams. One arb is equal to 100 krors (a kror being 10,000,000), and a hundred krors of dams are equal to 2 krors and 50 lacs of rupees." (हॉबसन-जॉबसन.) ('दाम करी काम बिबी करी सलाम', 'दाम रोख, काम चोख' आणि 'आपलाच दाम खोटा' ह्या म्हणी. संस्कृत 'द्रम्म' आणि ग्रीक 'द्राख्मा'वरून. 'कुसीदवृद्धिर्द्वैगुण्यं नात्येति सकृदाहृता' = 'एकदा वसूल केल्यानंतर कर्जाची रक्कम दुपटीहून अधिक होऊ शकत नाही.'- मनुस्मृति ८.१५१. कुसीद म्हणजे व्याजावर घेतलेले कर्ज-मोनिअर-विल्यम्स.)

चाम-(चर्म) नाण्यासारखे वापरले जाणारे चामड्याचे तुकडे. एका आण्याचे तीस दाम, एका दामाचे तीस चाम. (मोल्सवर्थ.) 'राजा करी तैसे दाम, चाम तेहि चालती.' 'चामाचे दाम चालविणे' म्हणजे अधिकाराच्या जोरावर कातड्याचे नाणे चालविणे, अनन्वित कृत्ये करणे. (दाते-कर्वे.)

छदाम - १/४ पैसा किमतीचे एक छोटे नाणे, दोन दमड्या, सहा दाम (उत्पत्ती षट्-दाम). तुला माझ्याकडून एक छदाम मिळणार नाही! (दाते-कर्वे.)

फद्या-मुख्यत्वेकरून जुन्या मुंबई इलाख्यात हा शब्द प्रचलित होता. ह्याचा अर्थ एक पैशाचे तांब्याचे नाणे. (मोल्सवर्थ). ४ पै. (दाते-कर्वे.) पोर्तुगीज सत्तेखाली असलेल्या पश्चिम किनाऱ्याच्या भागात १६व्या शतकात Fedea-Fuddea आणि Pardao नावाची नाणी वापरात होती आणि २० फदीआ म्हणजे १ पर्दाओ असे कोष्टक होते. Fedea-Fuddeaपासून 'फद्या' निर्माण झाला. (हॉबसन-जॉबसन.)

दुडू दुड्डू-तांब्याचा पैसा. (मोल्सवर्थ.) कन्नड भाषेत १/३ आणा. कारण १ आणा=४ पै मानत असत. (दाते-कर्वे.)

दमडा - दमडी. मूळ संस्कृत द्रम्म=१/४ पैसा=१०वा १२ कवड्या. (मोल्सवर्थ.) २० कवड्या. (दाते-कर्वे.) (दीडदमडीचा माणूस, चमडी देईल पण दमडी देणार नाहीं.)

नासरी - अर्ध्या दमडीच्या बरोबरीचे एक नाणे. (मोल्सवर्थ.) अर्धी दमडी. (दाते-कर्वे.)

पचकी - दमडीच्या बरोबरचे एक तांब्याचे नाणे. (मोल्सवर्थ.)

टोली - एका पैशाचा आठवा भाग आणि एका दमडीचा अर्धा भाग. 'न लगे

वेंचावें टोलीधन नावें । तुका म्हणे भावें चाड एक ॥' (मोल्सवर्थ आणि दाते-कर्वे.)

दिडकी - एक नाणे, दीड दुगाणी, (मोल्सवर्थ.) एक पैसा, दीड दुगाणी नाणे. (दाते-कर्वे.) दुगाणी-तांब्याचे एक जुने नाणे, १/२ पैसा, 'न लाभता तो न मिळे दुगाणी.' (दाते-कर्वे.)

कोष्टक : २८ कवड्या=१ बोरी, १२ बोरी=१ दुगाणी, १२ दुगाणी= १ रुपया. (हॉब्सन-जॉब्सन.)

दुकार-'एक आणा' अशा अर्थाचा ग्राम्य शब्द. (मोल्सवर्थ.)

आणा - मुसलमानी शासनकाळापासून प्रारंभ. १/१६ रुपया. (हॉब्सन-जॉब्सन.)

चवली, पावली, अधेली - २ आण्याच्या, ४ आण्याच्या आणि ८ आण्याच्या नाण्यांची ही नावे सर्वांना परिचित आहेत. १९५७ साली दशमान पद्धती येईपर्यंत हे शब्द रोजच्या वापरात होते. चवलीला 'चवल' आणि 'दुणेली' असे पर्यायी शब्द होते. तसेच १ आण्याच्या नाण्याला 'गिन्नी' म्हणत असत असेही स्मरते.

धरण - ९ आण्यांचे वजन (मोल्सवर्थ.) ('धरण' ह्या शब्दाचे 'वजन' अशा छटेचे अनेक अर्थ मोनिअर-विल्यम्समध्ये दिले आहेत. मनुस्मृति, अध्याय ८, येथेही ह्याविषयी कोष्टक आढळते.)

होन - शिवराज्याभिषेकसमयी पाडलेले सोन्याचे नाणे. (हंसाचे चित्र असलेले सोन्याचे नाणे असा मूळ अर्थ, नंतर कसलेही सोन्याचे नाणे.) होनाचे प्रकार-पादशाही होन, सणगिरी होन, अच्युतराई होन, रानराई होन, देवराई होन, जडमाळ होन, धारवाडी होन, कावरी होन, शैल्यघाटी होन, पामनायकी होन, अदवानी होन, ताडपत्री होन, निशाणी होन, उकिरी होन, सापे होन, एकेरी होन. म्हण-होनापायली होणें म्हणजे एका पायलीची किंमत एक होन, अतिशय महाग. (मोल्सवर्थ). 'रायें होन दिधले । हरिनें ठेविलें धोकटीं' सेना न्हावी (तुळपुळे.). ह्यावरून शब्द होनमाळ= होन गुंफून केलेला गळ्याचा दागिना. (मोल्सवर्थ.) (ह्यावरूनच मला अशी शंका येते की येथूनच होनमाळ म्हणजे 'होनहार' 'अतिशय चांगला, सद्गुणी' असा शब्द निर्माण झाला असेल काय? होनाच्या ह्या प्रकारांपैकी काहींचा अर्थ स्पष्ट आहे. बाकीपैकी अच्युतराई होन, रामराई होन, देवराई होन ही नावे विजयानगरच्या राजांवरून झालेली दिसतात. सणगरी=शृंगेरी असावे काय? अदवनी म्हणजे अडोनी, उकेरी म्हणजे हुक्केरी, ताडपत्री म्हणजे सध्याचे रायलसीमेतील अनंतपुर जिल्ह्यातील 'ताडिपत्री' हे पुरातन गाव, शैल्यघाटी म्हणजे श्रीशैलम् इतके स्पष्ट दिसते.)

पुतळी - सुमारे ४ रुपये किमतीचे नाणे. (मोल्सवर्थ.) कुंकवावर लावण्याची पितळ, रूपे, काच इत्यादीची टिकली, एक प्रकारचे नाणे (दाते-कर्वे.) ('पुतळ्यांची माळ' हा मराठमोळा दागिना प्रसिद्ध आहे.)

फलक - सुमारे ३ रुपये किमतीचे सोन्याचे नाणे. (मोल्सवर्थ.) तमिळ 'पणम्' 'पैसा'. संस्कृत 'पण'. ह्यावरून हे नाणे कधी सोन्याचे, कधी चांदीचे तर कधी हीण मिसळलेल्या सोन्याचे असे. (हाब्सन-जॉब्सन. तेथेच अजूनही बरीच माहिती उपलब्ध आहे. ह्यासारख्या 'फनम' अशा नावाचे एक नाणे मद्रास इलाख्यात १९व्या शतकाच्या सुरुवातीच्या दिवसांपर्यंत रुपयाच्या जोडीने चालू होते. पहा http://en.wikipedia.org/wiki/Madras_fanam)

मोहोर, मोहर-१५ रुपये किमतीचे सोन्याचे नाणे, रुपया वा अन्य नाण्यांवरील खूण. (दाते-कर्वे.) 'अकबरी मोहोर सर्वत्र तडक चालती.' (मोल्सवर्थ.) सोन्याची मोहोर हे एक नाणे. (तुळपुळे.) 'अलाई मोहर' अलाउद्दीन खिलजीची मोहर. (चतुर्वेदी.) इ०स० १२००च्या सुमारास ह्याचे वजन १०० रती सोने इतके होते आणि विनिमयदर १० चांदीच्या रुपयांबरोबर असावा. कंपनी सरकारने १७७६त पाडलेल्या मोहरेमध्ये शुद्ध सोने १४९.७२ ग्रॅम इतके असून विनिमय १४ सिक्का रुपये इतका होता. (हॉबसन-जॉबसन.)

तोडा=एकत्र १००० नाण्यांची थैली. (मोल्सवर्थ.) सोन्याची, चांदीची मोहरा, रुपये इ० हजार नाणी भरलेली पिशवी. (दाते-कर्वे.)

खोका आणि पेटी - ह्या सर्व शब्दसंभारामध्ये अगदी अलीकडेच पडलेली भर म्हणजे धनदांडगे-गुन्हेगार-राजकारणी-भ्रष्ट सरकारी नोकर ह्यांच्या संगनमतातून निर्माण झालेले, अनुक्रमे एक कोटी रुपये अणि एक लाख रुपये अशा अर्थांचे हे दोन शब्द.

(ह्यापुढील 'नंदभाषे'चे वर्णन दाते-कर्वेमध्ये सापडले. मला तरी हे पूर्ण अज्ञात होते. सर्वांच्या माहितीसाठी येथे देत आहे.)

नंदभाषा : बाजारात इतरांना कळू नये म्हणून व्यापारी 'नंदभाषा' नावाची एक सांकेतिक भाषा वापरत असत. त्या भाषेमध्ये नाण्यांच्या उल्लेखांसाठी विशेष शब्द आहेत. त्यातील अर्थ : केवली, भुरका-एक, आवरु-दोन, उधानू-तीन, पोकू-चार, मुळू-पाच, शेली-सहा, पवित्र-सात, मंगी-आठ, तेवसू, लेवनू-नऊ, अंगुळू-दहा, एकडा-अकरा, रेघी-बारा, तेपरु-तेरा, चोपडू-चौदा, तळी-पंधरा. एक, दोन इत्यादींचे सांकेतिक शब्द, नंतर तान असा शब्द आणि तदनंतर तळी (पंधरा) असा शब्द जोडून सोळा, सतरा इत्यादींचे संकेत होत असत, जसे भुरका तान तळी - सोळा, आवरु तान तळी - सतरा इ० त्याचप्रमाणे बिटी - शंभर, ढकार - हजार, नाण्यांसाठी संकेत : भुरका एक रुपया, टाली-अर्धा रुपया, पकार-चार आणे, चकार-दोन आणे, दुकार-एक आणा, फाटा-आणा, अवारु फाटे-दोन आणे.

ही संकेतभाषा त्या काळात बऱ्याच जणांना माहीत असावी; कारण ह्या संकेतात बांधलेली विसोबा खेचरांची एक रचना दाते-कर्वे देतात : (ही पंचानन शंकराची स्तुती

दिसते.) : मुळु वदनाचा । उधानु नेत्रांचा। अंगळू हातांचा । स्वामी माझा।। मुगुट जयाचा। केवळ्या आगळी काठी । पवित्र तळवटी । चरण ज्याचे ।। ढकार वदनाचा। आला वर्णावया। जिह्वा त्याच्या चिरल्या । वर्णवेना ।। शेली वेडावली । पोकू मौनावली। अंगुळूमंगी थकली । नकळे त्यासी ।। सद्भावे शरण । अवारु जोडून । खेचरविसा म्हणे। स्वामी माझा ।। (अर्थ : पाच मुखांचा, तीन नेत्रांचा, दहा हातांचा माझा स्वामी आहे. (मुगुट जयाचा। केवळ्या आगळी काठी। पवित्र तळवटी । चरण ज्याचे ।। ह्याचा अर्थ मला लागत नाही. केवळ्या १, काठी २०, पवित्र ७ असे दाते-कर्वे सांगतात.) एक हजार मुखांचा वर्णन करायला लागला, ज्याच्या जिभा चिरल्या पण वर्णन पूर्ण झाले नाही. (शेली वेडावली। पोकू मौनावली। अंगुळूमंगी थकली। नकळे त्यासी ।। ह्याचाही अर्थ मला लागत नाही. शेली ६, पोकू ४, अंगुळूमंगी म्हणजे १०+८ = १८ असे दाते-कर्वे सांगतात.) सद्भावाने शरण जाऊन दोन (हात) जोडून विसा खेचर म्हणतो- स्वामी माझा.)

अखेरीस पुनः 'पैसाअडका.' हा शब्द मूळचा 'पैकाअडका' असा असू शकेल असे वाटते; कारण का-का हा अनुप्रास चांगला जुळतो आहे आणि 'पैका'च नंतर केव्हातरी 'पैसा' झाला असावा.

तुळपुळे-फेल्डहाउसमध्ये 'पाइका' असा शब्द दिला असून त्याचा उगम 'पदिक' ह्या संस्कृत शब्दाशी दाखविला आहे. दाते-कर्वेमध्ये 'पाईक' ह्या शब्दाचा उगम संस्कृत 'पदाति', प्राकृत 'पाइक्क', मराठी 'पाईक' असा दाखविला आहे. आपटेमध्ये 'पदाति', 'पादाति', 'पादातिक', 'पादाविक' अशा शब्दांचा समाईक अर्थ 'foot-soldier' असा दिला आहे. ह्या शब्दांवरून 'पाईक' असा मराठी शब्द साधला जाणे अशक्य नाही. पाईकाचे वेतन म्हणजे 'पैका' असेही असू शकेल. प्रत्यक्षात रुपये-आणे-पैसे-पै हे कोष्टकही मुसलमानी राजवटींपासूनच सुरू झालेले आहे असे वाटते; कारण हे किंवा त्यांच्याशी जुळते शब्द जुन्या संस्कृत वाङ्मयात भेटत नाहीत.

ह्या सर्व वर्णनावरून अजून एक गोष्ट ध्यानी येते. बहुशः सर्व शब्दवैविध्य किरकोळ मूल्याच्या कवडी, दमडा, टका अशा नाण्याभोवतीच फिरताना दिसते. रुपया, होन, मोहोर अशांना समानार्थी शब्द फार नाहीत. आजच्या तुलनेने अतिस्वस्ताई आणि सार्वत्रिक दारिद्र्य ह्यांमुळे बहुजन समाजाचा मोठ्या नाण्यांशी संबंध क्वचितच येत असेल. गोरगरीब कशाला मोहरा आणि होनांची उठाठेव करीत बसेल? त्याला ही नाणी पाहायलाही मिळणे दुर्मीळ!

■





अनुक्रमणिका

# उस्मानाबाद जिल्ह्यातील सीतारूपधारिणी पार्वतीच्या आख्यायिका

- नवनाथ अंगदा शिंदे

आख्यायिका हा लोककथेचा एक वैशिष्ट्यपूर्ण प्रकार असून त्या त्या प्रदेशाच्या वैशिष्ट्यांचे स्पष्ट प्रतिबिंब तिच्यातून दृगोचर होत असते. प्रस्तुत लेखात उस्मानाबाद जिल्ह्यात प्रचलित असणाऱ्या सीतारूपधारिणी पार्वतीच्या आख्यायिकांच्या आशयाचे स्वरूप कोणत्या प्रकारचे आहे, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. या आख्यायिकांतून तत्कालीन संस्कृती, परिसरातील धार्मिक आणि सामाजिक लोकजीवनाचे दर्शन होते. त्यामुळे हा अभ्यास मला महत्त्वाचा वाटतो.

**सीतारूपधारिणी पार्वतीच्या आख्यायिका**

रामलिंग मंदिर येडशीजवळ असून ''या प्रवाह-संगमात स्नान करून प्रभू श्रीरामांनी शिवलिंगाची पूजा केली. म्हणून भगवान शंकर यांचे हे तीर्थक्षेत्र रामलिंग या नावाने प्रसिद्ध झाले. सीताहरणाच्या वेळी या दंडकरण्यातून राम व लक्ष्मणाचा संचार झाला. त्यांचे हे स्थान आहे.''[१] श्रावण महिना व दर सोमवारी भक्तगण मोठ्या प्रमाणात येथे येतात.

''रामलिंगाच्या पायऱ्या सीता येंगती जोमानं
छत्री धरीली रामानं अशी तिच्या सत्तवानं
रामलिंगाच्या पायऱ्या चढता झालं ऊन
सीताबाई बोलती मोठं कठीण दर्शन
सकाळी उठोनी सडा घालते शेणाचा
रामलिंग देवाचा मला शेजार वाण्याचा''[२]

राम व शंकर या स्थळी भेटले म्हणून हे राम-लिंग तीर्थक्षेत्र होय, असा संदर्भ वरील ओवीगीतात सापडतो. शंकर लिंगायत समाजाचे दैवत असले तरी विष्णुजप करीत असतात तर विठ्ठल, बार्शीचा भगवंत, श्रीतुळजाभवानी, श्रीमहालक्ष्मी आपल्या मस्तकावर शिवलिंग धारण करतात, असे यांचे अद्वैत. बार्शीजवळील येडशीच्या डोंगराची वाट बिकट असतानाही उन्हातान्हात सीतेच्या डोक्यावर छत्री धरून राम शंकर भेटीला येतात, असा उल्लेख येतो. परंतु लोकोक्तीमध्ये सीताहरणाचे संदर्भ आढळतात. राम, सीता, लक्ष्मण

यांच्या एकत्रित वनवासी वाटचालीतले हे शेवटचे ठिकाण असावे का?, या तीर्थक्षेत्राच्या दर्शनानंतरच पुढच्या प्रवासात सीताहरण झाले असावे का? असे प्रश्न येथे निर्माण होतात.

''सीतेचं रावणाने हरण केल्यानंतर राम सीतेच्या शोधार्थ रानीवनी भटकत होता. 'सीताऽ सीताऽ' असे मोठ्याने ओरडून ''सीता कुठे आहे?'' म्हणून ज्याला-त्याला विचारात होता. रामाची परीक्षा घेण्यासाठी पार्वती सीतारूप धारण करते. राम दिसल्याच्या आनंदाने सीता रामाला आलिंगन देण्यास धावते. तेवढ्यात रामाने खाली वाकून भवानीचे पाय धरले, आणि म्हणाला, 'तू का आई इथे?' रामाच्या या प्रश्नावरून या देवीला 'तुकाई' असे म्हटले जाते.''[३] 'दक्षिणेस जा आणि विजयी होऊन परत ये' असा भवानीने रामास आशीर्वाद दिल्याचेही लोक सांगतात. वरील प्रसंगाचे संत एकनाथांनी केलेले वर्णन असे :

''श्रीराम म्हणे तू का आई । तेंची नाम लोकांचे ठायी ॥
अद्यापि राहिलेसे पाही । म्हणती तुकाई जगदंबा ॥
तुकाई नामे निदान । ते जगदंबेचे निजस्थान ॥
अद्यापि पूजती जन । अति पावन दंडकारण्यीं ॥
श्रीराम वरदायिनी माता । तुकाई म्हणती राम वाच्यार्था ॥
पुढे काय वर्तली कथा । सावधान श्रोती परिसावीं ॥
हांसोनी बोले रघुनंदन । माते तुज आलो लोटांगण ॥
तुवा माझे न करावें छळण । मी अनन्यदीन शिवाचे ॥''[४]

सीताविरहाने विव्हल झालेल्या वनवासी रामाची परीक्षा घेण्यासाठी सीतारूपाने प्रकटलेल्या भवानीची कथा तुळजापूरच्या संदर्भात आनंदरामायणाच्या कर्त्याने सारकांडात विस्ताराने ग्रथित केली आहे. आनंदरामायणाच्या यात्राकांडात रामाने चार दिशांकडील पवित्र स्थानांची यात्रा केल्याची वर्णने आहेत. रामाची यात्रा उडुपी, श्रृंगेरी-गोकर्ण-महाबळेश्वर या क्रमाने पुढे महाराष्ट्रात सुरू झाल्यानंतर ग्रंथकाराने महाराष्ट्रातील अनेक लहान-मोठ्या तीर्थक्षेत्रांची नावे आवर्जून नोंदवली आहेत. यामध्ये नळदुर्ग, तुळजापूर, तेर, माणकेश्वर इ० पवित्र स्थानांची नोंद केली आहे. स्त्रियांच्या ओव्यांमध्ये राम अवताराला खूपच महत्त्व दिले आहे.

''राम लक्ष्मण झाले दोही रानभरी ।
रामाची सीतबाई नेली रावणाच्या घरी ॥''[५]

रामायणाचा हा कथाभाग अगणित ओव्यांचा विषय बनला आहे. श्रीतुळजा-भवानीच्या भक्तीचा प्रसार लोकसंस्कृतीच्या उपासकांनी लोकगीतांबरोबरच कथागीतांच्या माध्यमातून नेहमीच केला आहे. पार्वतीचे सीतारूपाविषयी डॉ० धोंडीराम वाडकर म्हणतात, ''तुमच्या या स्त्रीलोभी रामाला कशी फसवते पाहा. शंकराने पार्वतीला अनेक

प्रकारे समजावण्याचा प्रयत्न केला. पण पार्वती काही ऐकेना, तेव्हा शंकराने तिला सांगितले. ''पाषाण, झाड यांना रामाचे कवटाळणे म्हणजे ते सर्व पूर्वीचे ऋषी आहेत. शापामुळे ते पाषाण झाले आहेत. रामाने स्पर्श केल्यामुळे ते शापयुक्त होताहेत.''[६] पार्वती-रूपाला न फसणारा राम एकवचनी, एकबाणी, एकपत्नी असा आदर्श राजा होता. रामाचा सीताशोध आणि पौराणिक शापामधून सुटका यांचा समन्वय साधणाऱ्या अनेक आख्यायिका महाराष्ट्रभर आढळतात. सीता-शोधाचे काम यशस्वी न झाल्यामुळे लोकजीवनात 'राम आंधळा आणि सीताला डोळे' ही लोकोक्ती ''कुणी कुणाला फसवले''[७] अशा अर्थाने वापरल्याचे आढळते. इथेही पार्वती वेगवेगळी रूपे धारण करून रामाला फसवताना दिसते. चित्रमयता हा या आख्यायिकांचा विशेष आहे.

सोलापूर-औरंगाबाद रस्त्यानजीक दोन किलोमीटर अंतरावर उंच निसर्गरम्य टेकडीवर येडेश्वरी देवस्थान आहे. 'येडाई-येडेश्वरी, येडाबाई' असे नाव का पडले? याविषयी दत्ता बेडके यांनी सांगितलेली आख्यायिका अशी- ''प्रभु रामचंद्र ज्यावेळी वनवासाला निघाले, तेव्हा त्यांना प्रलोभन दाखविण्यासाठी देवी पार्वतीने सीतेचे रूप घेऊन त्यांना भुलवण्याचा प्रयत्न केला. तेव्हा रामाने पार्वतीला 'वेडी आहेस' असे म्हटले. तेव्हापासून देवी त्याच ठिकाणी राहिली व येडाई (येडेश्वरी) झाली.''[८] या अनुषंगाने लोकजीवनात वरील आशय कथन करणाऱ्या आख्यायिकांची अनेक रूपे आढळतात. देवी येडाईचे नाममाहात्म्य आणि सीता-शोधाबद्दल मिळालेली माहिती अशी - ''सीता शोधाविषयीची प्रभूंची दयनीय अवस्था पार्वती कैलासातून पाहत होती. तिने शंकराला प्रश्न विचारला की, 'तुमचे सर्वस्व असणारा राम, पत्नीविरहाने व्याकूळ झाला आहे. म्हणजेच तो मोहमायेच्या आहारी गेला आहे की काय?' त्यावर शंकर शांतपणे उत्तरले, ''पार्वती, प्रभूने सध्या मानवाचा अवतार परिधारण केला आहे. त्यामुळे तो केवळ सर्व जगाला दाखवण्यासाठी आणि दुर्जनांचा नाश करण्यासाठी एक नाटक करत आहे.'' या उत्तराने पार्वतीचे मात्र समाधान झाले नाही. तिने रामाची परीक्षा घेण्याचे ठरवले. त्यासाठी तिने सीतेचे रूप धारण केले. बालाघाटच्या पंचक्रोशीत पार्वतीमाता प्रभू रामचंद्रासमोर उभी राहिली. त्या पार्वतीमातेला पाहताच प्रभू उद्‌गारले, 'तू का आई वेडाबाई' आणि या वाक्याचा संदर्भ घेऊन डोंगर टेकडीवर येडाईची प्रतिष्ठापना झाली.''[९] तुळजापूरमधील घाटशिळ आणि प्रभू रामचंद्रांच्या अविरत भटकंती संदर्भात माहिती सांगताना वृद्ध महिला कौशल्या शिंदे म्हणाल्या, ''प्रभू रामचंद्र सीतेचा शोध घेत या मार्गाने आले असता पार्वतीने सीतारूप घेऊन त्यांना मीच तुमची सीता आहे असे भासविण्याचा प्रयत्न केला. त्या ठिकाणी खडकावर पावले उमटलेली दिसतात. आता तेथेच घाटशिळ मंदिर आहे.''[१०] शत्रूंच्या संहारासाठी पार्वतीदेवी निरनिराळ्या स्वरूपात अवतरते. प्रसंगानुरूप उग्र रूपही धारण करून देवांना मदत करते. सर्व आसुरांचा नाश करून, जनतेलाही सुखी ठेवून त्यांना

निर्भय बनवते. परंतु वरील आख्यायिकांमध्ये ती भक्तांची परीक्षाही घेताना आढळते.

> ''सीता सीता म्हणुनी राम कवटाळितो बोरी
> त्याच्या जानकीवरी प्रेम त्याचं खरोखरी''[११]

असंही पत्नीप्रेम लौकिक पातळीवर आदराचा विषय ठरते. माणकेश्वरच्या देवीला 'सटवाई' हे नाव का पडले? याविषयी अनुसया गुरव यांनी सांगितलेली आख्यायिका अशी- ''पूर्वी येथे दाट अरण्य, झाडीझुडपं होती. इकडे कुणी फिरकत नव्हते. रावणाने सीता पळविल्यानंतर राम सीतेला हुडकत रामलिंग, तुळजापूर, येरमाळा, माणकेश्वर मार्गे करमाळ्यास निघाले होते. माणकेश्वर येथे कथा अशी घडली : सटवाई श्रीरामाची चेष्टा करण्यासाठी सीतेच्या रूपात श्रीरामासमोर उभी राहिली. 'सटवाई, फसवती का मला?' असं म्हणून रामाने सटवाईला ओळखले. मग खऱ्या रूपात सटवाई प्रकट झाली. नंतर तिने श्रीरामास लंकेचा मार्ग दाखविला.[१२] तेव्हापासून देवीस सटवाई देवी असे नाव झाल्याचे लोक सांगतात.

यमाई हे अंबाबाईचे, भवानीचेच रूप आहे. महाराष्ट्रभर गावोगावी जगदंबा, भवानीमातेची अनेक रूपे निरनिराळ्या नावांनी प्रचलित आहेत. औंधचे यमाई देवस्थान, वाडी रत्नागिरी येथील यमाई, शिवरीची यमाई, सारोळी आणि राशिन (जि० नगर), कण्हेसर (जि० पुणे), मार्डी (जि० सोलापूर), परंडा तालुक्यातील हिंगणगावची यमाई, लोणीची यमाई, यमाई मंदिर राजुरी (ता० उस्मानाबाद) अशी महाराष्ट्रभर यमाईदेवीची बरीच स्थाने आहेत. ''ज्योतिर्लिंगाने श्रीमहालक्ष्मीचा 'ये माई, ये माई' असा धावा केल्याने श्रीमहालक्ष्मी यमाईच्या स्वरूपात येथे प्रकट झाली.''[१३] यमाई हे दुर्गेचे एक रूप आहे. ''राम वनवासात असताना रावणाने सीतेचे हरण केले. रामाला शोक अनावर होऊन तो सीतेऽऽ सीतेऽऽ असे मोठ्याने ओरडू लागला. मग तेथे आदिमाता पार्वती सीतारूप धारण करून त्याच्या पुढे आली. परंतु रामाने पार्वतीला ओळखले. म्हटले, की ये माई! त्यावरून येथे पार्वतीरूपाला यमाई हे नाव मिळाले.''[१४] अशी आख्यायिका परंडा तालुक्यातील हिंगणगावच्या यमाई देवस्थानाविषयी सौ. इंदुबाई साबळे यांनी सांगितली.

सासवडजवळील शिवरी येथे श्रीक्षेत्र यमाईचे प्राचीन स्थान आहे. याविषयी माहिती सांगताना श्री. उत्तम कांबळे म्हणाले, ''रावणाने सीतामाईस पळवून नेले. प्रभू रामचंद्र सीतेचा शोध घेत येथून जात होते. ते अतिशय दुःखी, कष्टी व सीतेच्या शोधात अगदी व्याकूळ झालेले होते. त्या वेळी भगवान शंकर व पार्वतीदेवी आकाशभ्रमण करीत चालले होते. अचानक त्यांचे लक्ष प्रभू रामचंद्रांकडे गेले. तेव्हा पार्वतीदेवीस रामाचे दुःख थोडे हलके करावेसे वाटले. म्हणून पार्वतीदेवीने सीतेचे रूप धारण केले. एका झाडामागे उभी राहिली. रामाचे लक्ष पार्वतीमातेकडे गेले; परंतु रामाने ओळखले की, ही सीता नसून

पार्वतीमाता आहे. म्हणून रामाने पार्वतीदेवीस 'ये माई' म्हणून हाक मारली. अशा प्रकारे रामाच्या मनातील मातेसंबंधीचा भाव जागृत होऊन पार्वतीमातेस रामाने माता म्हणून बोलविले व पार्वतीस 'यमाई' हे नाव रूढ झाले.''[१५] प्रत्येक परिसराने आपले विभिन्नत्व जपण्याचा प्रयत्न आख्यायिकांच्या माध्यमातून केल्याचे आढळले. मौखिक परंपरेने संक्रमित होणाऱ्या आख्यायिकेबरोबरच काही रचलेल्या आख्यायिकाही आपले स्थानमहात्म्य, सत्त्व सांभाळण्याचा सातत्याने प्रयत्न करताना दिसतात. या सर्व प्रक्रियेमागे पुन्हा 'लोक'च असतात. राम-लक्ष्मण-सीता यांच्या अनुषंगाने लोकजीवनात अनेक गाणी, ओव्या मौखिक स्वरूपात सापडतात.

''कपटी रावणानं कपटी इद्या केली
भिक्षा मागून सीता नेली.
राम लक्ष्मण, राम रडतो धायी धायी
सृष्टी धुंडील्यानं आसे भावंडं कुठं न्हायी
सकाळच्या पारी आधी रामाचं नाव घेवा
धरणी मातावरी मग पाऊल टाकावा.''[१६]

स्त्रीगीतात पौराणिकता व देवदेवतांची गाणी असली तरी त्यांचे स्वरूपलौकिक जीवन आशयाचे असते. अशा स्त्रीगीतांच्या आशयामध्ये विपुल प्रमाणात विविधता आढळते. लोकपरंपरेत रामकथांचा आविष्कार स्त्रीरचित जात्यावरच ओव्यांतून व्यापक प्रमाणावर झाला आहे.

राम म्हणू राम नाय सीतेच्या तोलाचा ।
हिरकणी सीतामाय राम हलक्या दिलाचा ॥
सीता शोधताना । रथ वाजे खडाखडा ॥
सीतेऽऽ सीतेऽऽ म्हणत । राम रडे धडधडा ॥

लोकगीतांत स्वत:च्या भूमिकेने धार्मिक, पौराणिक कथाभागाकडे पाहण्याची दृष्टी स्त्रियांच्या वरील गीतातून दिसून येते. वनवासकथा, रामाविषयीची भक्ती, सीतेशी असणाऱ्या जवळिकेचा प्रत्यय जात्यावरच्या ओव्यांतून येतो. परिसरातील लोकदैवते, त्यांच्या उपासना-पद्धती आणि श्रद्धा या विषयी गाणी येतात.

'मराठी आख्यायिका' हा संशोधनाचा पातळीवर तसा दुर्लक्षित राहिलेला विषय आहे. जगातील सर्वच भूभागात आख्यायिका आढळतात. अतिप्राचीन काळापासून त्या परंपरेने चालत आलेल्या असतात. लोकजीवनात सदरच्या आख्यायिकांचा नकळत स्वीकार होत असतो; समाजाला तिच्यातील आशय सत्य वाटत असतो. पाश्चात्त्य वाङ्मयात अशा अनेक आख्यायिका सापडतात.

मराठी 'आख्यायिका' अनेकार्थांनी वैशिष्ट्यपूर्ण आहेत. विशेषत: प्राचीन मराठी

आख्यायिकांची धार्मिक, सामाजिक व वाङ्मयीन गुणवत्ता लक्षात घेणे गरजेचे आहे. प्राचीन मराठी वाङ्मयातील संतचरित्रे आणि उस्मानाबाद जिल्ह्यातील धर्मस्थळांच्या काही आख्यायिका समजून घेतल्या तरी त्यातून अभ्यासकांना एक नवी दिशा मिळू शकेल. मराठी साहित्यामध्ये सर्वच काळांत आख्यायिकांची चर्चा होत आली आहे. प्राचीन किंवा मध्ययुगीन मराठी आख्यायिका या आख्यानकाव्याच्या अथवा चरित्रात्मक आख्यानांच्या माध्यमातून वाचकांच्या समोर येतात. आजही समाजात आणि साहित्यात अशा आख्यायिका ऐकायला, वाचायला मिळतात.

आख्यायिकांमधील देवीतत्त्वाने भारलेल्या प्राचीन मिथकांची प्रेरकता अनेक अंगांनी अभ्यसनीय आहे. सीताशोधासाठी शोकाकुल अवस्थेत धावणाऱ्या रामाची परीक्षा भवानीने कशी घेतली आणि त्या परीक्षेत उतरल्यावर रावणवधासाठी तिने त्याला कसे वरदान केले, ही तुळजापुरात प्रचलित असलेली रामवरदायिनीची प्रसिद्ध घटना तसेच 'यमाई' या नावाची लोकमानसातील व्युत्पत्ती रामाच्या मुखातील 'ये माई!' या उद्‌गारातून स्पष्ट होते; 'तुकाई' या नावाची व्युत्पत्ती 'तू का, आई?' या राममुखीच्या प्रश्नातून उलगडली आहे, खरेतर ही भवानीचीच वेगवेगळी रूपे आहेत, अशी येथील लोकांची श्रद्धा आहे. या संदर्भातील कथा, आख्यायिका लोकजीवनाचा अविभाज्य भाग झाल्या असून ह्या कथा लोक मोठ्या श्रद्धेने सांगतात/ऐकतात. धार्मिक पार्श्वभूमी आणि दैवी विषय ही दैवतकथांची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत.

आख्यायिकांच्या मुळाशी काही प्रमाणात सत्य असते. पण ते सत्य कल्पनावगुंठित असते. आख्यायिकेत आलेला सगळा तपशील वास्तवावर आधारलेला असतो असे म्हणता येत नाही; पण प्रत्येक कथेला सत्याचा आधार असतो. आख्यायिकेत अतिशयोक्ती, अद्‌भुतरम्य घटनाप्रसंगाचे चित्रण आलेले असते. तरीही तळाशी वास्तव दडलेले असते. लोकभाषेचा वापर आख्यायिकेमध्ये केलेला असतो. बोलीभाषेच्या अनेक खाणाखुणा त्यात जपलेल्या असतात. अशा तऱ्हेने त्या त्या काळातील समाज समजून घेण्यास आख्यायिका उपयुक्त ठरू शकतात. ■

**संदर्भ-टीपा :**


( १ ) http://osmanabad.nic.in/newsite/touristplaces/other.htm, Date : 15/03/2013

( २ ) डॉ० कुन्ता ना० जगदाळे, ''मराठी-मुस्लिम ओव्या'', नारायण जगदाळे, बार्शी. पहिली आवृत्ती, एप्रिल २००४, पृ० ९८.

( ३ ) शांताराम य० वाघ, मोशी, पुणे. यांनी सांगितलेली माहिती.

( ४ ) सौ० गीता आदिनाथ हरवंदे, ''महाराष्ट्रातील तीर्थयात्रा'', प्रफुल्लता प्रकाशन, पुणे. पहिली आवृत्ती, नोव्हेंबर २०११, पृ० ४४.

( ५ ) डॉ० भास्कर खांडगे, ''जातं : लोकसाहित्यातील ऐश्वर्य''. स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती, जानेवारी २०१२, पृ० ४८.
( ६ ) डॉ० धोंडीराम वाडकर, ''गोंधळ्यांचे लोकसाहित्य''. स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद. प्रथमावृत्ती, जानेवारी २००८, पृ० ५२.
( ७ ) विजय जीवन भोसले, मु०पो० रामपूर, ता० राहुरी यांनी सांगितलेली माहिती.
( ८ ) दत्ता बेडके, ता० कळंब, यांनी सांगितलेली आख्यायिका.
( ९ ) बापूसाहेब बेंद्रे, येरमाळा यांनी दिलेली माहिती.
(१०) कौशल्य बाबासाहेब शिंदे, लोणी, ता० परंडा यांनी सांगितलेली माहिती.
(११) सुदामती रामचंद्र शिंदे, लोणी, ता० परंडा यांनी गायिलेली ओवी.
(१२) अनुसया गुरव, माणकेश्वर, यांनी आख्यायिका सांगितली.
(१३) राजाराम बिभीषण शिंदे, लोणी, ता० परंडा यांनी दिलेली माहिती.
(१४) सौ० इंदुबाई उध्दव साबळे, मु०डोमगाव, ता०परंडा यांनी सांगितलेली आख्यायिका
(१५) श्री० उत्तम कांबळे, सासवड यांनी सांगितलेली आख्यायिका.
(१६) प्रा० अर्जुन व्हटकर, (संपा०), ''लोकसंस्कृतीच्या बळदातील धन''. स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद. प्रथमावृत्ती, जानेवारी २०११, पृ० १०८ ते १११.

**स्वागत**

( १ ) जर्मन-मराठी-सिंधी : भाषांतर शब्दकोश, अविनाश बिनीवाले, लछमण हर्दवाणी, सिंधु प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३८५, किंमत ४००/-

( २ ) सचित्र सिंधी बालभारती - प्रो०लछमण परसराम हर्दवाणी, पृष्ठे ४०, (प्रकाशक व किंमत अनुल्लेखित)

( ३ ) बांधिलकी २०१३-१४ : कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, देवळा, भाग १ : ग्रामशोध विशेषांक, भाग २ : ग्रामशोध-स्त्रीजीवन-विशेषांक, संपादक - एकनाथ पगार.

# मातीचे गायन

- डिंपल मापारी

'माझ्या मातीचे गायन, तुझ्या आकाश श्रुतींनी
जरा कानोसा देऊन, कधी ऐकशील का रे'...

वि०वा० शिरवाडकरांच्या ह्या काव्यपंक्तीप्रमाणे 'मातीचे गायन' करणारी माझ्या आजोळची भाषा. तिला मातीच्या ओलाव्यागत मायेचा जिव्हाळा आहे. वाशीम जिल्हा महाराष्ट्रातील एक जिल्हा आहे. जरी या भागाची भाषा ही 'वऱ्हाडी' या बोली प्रकारात मोडत असली तरी काही शब्द, म्हणी, वाक्प्रचार हे वेगळ्या स्वरूपाचे असलेले आढळतात.

मुख्य व्यवसाय शेती असणाऱ्या लोकांची भाषासुद्धा थोडी राकट आणि खरबडीत वाटते. शब्द, म्हणी ह्या स्वाभाविकच मातीशी घट्ट नातं सांगणाऱ्या आहेत. उदा० 'भोयलण' हा शब्द. शेतात काम करताना काही इचु-काटा डसल्यास, किडा-कीटक चावल्यास त्या जागी 'भोयलण' लावण्यात येते. 'भोय' म्हणजे जमीन, घरातली जी जमीन रोज शेणामातीने सारवली जाते, तिथे थोडे पाणी टाकून, गोलाकार फिरवत ते सारवण मिश्रित पाणी एका वाटीत घेतले जाते. तेच नंतर चुलीवर गरम करून दुखणाऱ्या भागावर लावले जाते.

बाजूला सरक म्हणण्यासाठी पुरुषवचनी 'वाला' तर स्त्रीवचनी 'वाली व्हय' म्हटल्या जाते. कुणाला जवळ बोलावयाचे असल्यास 'हिंगं' असे म्हणतात. 'माझे' ह्या अर्थी 'मापलं' तर 'तुझे' ह्यासाठी 'तुपलं' वापरण्याचा प्रघात आहे. 'मापलं'चा इतर बोलींमध्ये 'मोजणे' असा अर्थ होतो; पण इथे तो 'स्वत:चे', 'माझे' ह्यासाठी वापरल्या जातो. भाजीसाठी 'कोड्यास' हा शब्द आहे. हा शब्द कसा निर्माण झाला असावा ह्याचा अंदाज येत नाही; पण आज माझ्या घरी 'कोड्यास' नाही किंवा 'म्या हे कोड्यास केले' असे म्हणतात. पूर्वी वीज नसल्यामुळे दिवे वापरत, तेव्हा छोट्या दिव्याला 'चिमणी', तर त्यात टाकायचे तेल (घासलेट) हे 'चिडीचे तेल' वा 'मातीचे तेल'. कुणी जर खूप रागावले, वैतागले तर 'त्यो काहुन खेबाळल्ला?' अशी विचारणा करण्यात येते. कुणाच्या लग्नाला जाणे ह्याला 'लग्नावड जाणे' तर 'कटकट जाणे' ह्याला 'कणकण जाणे', एखादी वस्तू संपूर्णपणे संपली असल्यास, 'खड्डून नाही' म्हणतात.

पळसाच्या पानाच्या पत्रावळीला - इस्तादी





अनुक्रमणिका

द्रोणाला - डोना
तंबाखूसाठी - तमाखा
त्र्यंबकसाठी - तिरमखा
राक्षससाठी - राकेसं
विहीर - इहीर, इह्‍‍ऱ्या
डोक्यावरचे सगळे केस काढणे - डोस्की करणे
बुंदी - बुक्ती

'तंबाखूमध्ये 'ब' ह्या औष्ठ्यऐवजी 'मं' होतो, तर 'त्र्यंबक'मध्ये 'त्र्यं'च्या ऐवजी 'तिर' हा सोपा पर्याय निवडण्यात येतो.

पाण्यासाठी आज स्त्रियांना पूर्वीइतका त्रास नाही. त्यामुळे 'चुंबळ' हा शब्द लुप्त होण्याच्या मार्गावर दिसतो. 'चुंबळ' ही गोलाकार रिंगसारखी असते, जी जुन्या कपड्यांना गुंडाळून तयार केली जाते. ही चुंबळ डोक्यावर असली की त्यावर हंडा, घागरी व्यवस्थित बसतात.

कुठल्याही भाषेतील म्हणी म्हणजे भाषेचा अर्क, सार. त्यांच्यातून कमीतकमी शब्दांत, खूप मोठा अर्थ सांगितला जातो.

- उदा० 'सुगरन साताची अन् हिरव्या दाताची'
  जी स्त्री आपल्याला उत्तम स्वयंपाक येतो अशा बढाया मारते पण मुळात काहीच येत नाही तिला खिजविण्यासाठी ही म्हण वापरतात.
- 'खिश्यात नाही कवड्या अन् बैंगन केवढ्या?'
  जवळ पैसे नसताना उगाचच भाव विचारणे, घासाघीस करणे.
- 'तू बोर बाई चार मि तं कवाराच्याच आर'
  तोतऱ्या व्यक्तीला बोलण्याची हौस फार असे सुचविणारी ही म्हण एका गोष्टीपासून निर्माण झाली. जिथे तोतऱ्या मुलीला बघायला मुलाकडचे येतात; पण तिला सक्त ताकीद असते की, 'तू बोलायचे नाही' पण ती वरील वाक्य बोलते आीण 'सोयरिक' तुटते.
- 'सून तसा लेक अन् तमाशा देख.'
- 'मूठभर घुगऱ्या रातभर मचमच' छोट्या/थोड्या कामासाठी खूप वेळ लावणे.
- 'काना (चकणा) कैपती (इब्लीस), लंगडा हिकमती (चतुर)
- 'शेजीच्या घरी सुनंची मया करी'
  शेजारणीच्या घरी गेल्यावर सासूने सुनेचे कौतुक करणे.

झाडाच्या एकदम वरच्या टोकासाठी 'सागर शेंडा', छोटे छोटे दिवे ठेवायची भिंतीतली जागा म्हणजे 'देवळी'.

ह्या बोलीलाही इतर बोलींप्रमाणे तिचे स्वत:चे असे सौंदर्य आहे. पण आधुनिकीकरणामुळे, शहरीकरणामुळे नवीन येणारी पिढी ह्यातील शब्दांचा वापर टाळताना दिसते. प्रत्येकाने आपल्या बोलीचा सार्थ अभिमान बाळगून, तिचा जास्तीत जास्त वापर करून ती पुढच्या पिढीपर्यंत पोहोचविली तर आपोआपच तिचे संवर्धन होईल.

काही इतर शब्द :

(१) इलटे - इरफाटे
(२) नाहीतर - नखरतं
(३) रागावणे - कोटाडणे
(४) वीज - इज
(५) विजार - इजार
(६) विस्तव - इस्तो
(७) करंगळी - कणगाळी
(८) अंगरखा/शर्ट - आंगडं

■

**मूलतत्त्ववाद = स्थितीवाद = देशीवाद?**

आपल्या संस्कृतीमधील सर्वच गोष्टी त्या विशिष्ट भूप्रदेशातील लोकांना केवळ चांगल्याच वाटत नाहीत, तर त्या पवित्रही वाटत असतात. या पवित्र गोष्टींची कोणतीही शहानिशा न करता वा होऊ न देता भक्तिभावानं जपल्या जातात. या भक्तिभावाच्या पोटीच देशीवाद जन्माला येतो. देशीवाद ही स्थितीवादी प्रवृत्ती आहे. या प्रवृत्तीला परिवर्तन गैरसोयीचं म्हणजे तिनं तिच्या रक्षणासाठी उभारलेल्या रुढी-परंपरेच्या भिंती तोडणारं वाटतं.

संपर्क दोन व्यक्तींमध्ये येवो, दोन समाजांमध्ये वा दोन संस्कृतींमध्ये येवो, हा संपर्क बदलाच्या प्रक्रियेचा प्रारंभ ठरतोच. या प्रक्रियेमागं तुलनेचं तत्त्व असतं. कळत-नकळत या संपर्कापोटी शुद्धीकरणाची वा परिष्करणाची गरज साकार होते. अंधार अस्ताला जात राहतो. प्रकाशाची टक्केवारी वाढत जाते.

- यशवंत मनोहर, 'दै० सकाळ', ०७-१२-२०१४

ग्रंथालय परिषद मराठी

# तुकाराम.कॉम

- सुशान्त शंकर देवळेकर

संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचे साहित्य हा मराठी भाषेचा अमोल ठेवा आहे. तुकोबांच्या अभंगवाणीचे आकर्षण भाषेचा आणि प्रांताच्या सीमा ओलांडून कधीच विश्वभर पोचलेले आहे. मराठी भाषेला समृद्ध करणाऱ्या तुकोबांच्या साहित्याचा तसेच त्यांच्या चरित्राचा हा ठेवा 'तुकाराम.कॉम' (http://tukaram.com) हे संकेतस्थळ अनेक भाषांमध्ये उपलब्ध करून देते. मराठी वगळता दहा भारतीय भाषा आणि पाच परदेशी भाषा यांमध्ये तुकोबांचे चरित्र आणि साहित्य ह्या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. संकेतस्थळाचे प्रकल्पसमन्वयक श्री० दिलीप धोंडे हे असून डॉ० सदानंद मोरे आणि दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांच्या मार्गदर्शनाखाली नरेंद्र बऱ्हाटे, गिरीश गांधी, देवेन राक्षे, सतीश पंडिलवार आणि त्यांचे सहकारी ह्यांनी हे संकेतस्थळ तयार केले आहे. प्रस्तुत टिपणात ह्या संकेतस्थळावरील मुख्यत्वे मराठीतील सामग्रीचा आढावा घेतला आहे.

'अभंगगाथा' ह्या विभागात तुकोबांच्या गाथेतील अभंग उपलब्ध करून देण्यात आले आहेत. शासकीय प्रत, संताजीमहाराज जगनाडे ह्यांची प्रत तसेच शिरवळकरप्रत अशा तीन प्रतींचा आधार घेण्यात आला असून त्या प्रतींचे संदर्भही प्रत्येक पानावर नोंदवलेले आहेत. ह्या विभागात सध्या गाथेतील सर्व अभंग युनिकोड-संकेतात उपलब्ध नाहीत. त्यांच्या टंकलेखनाचे काम चालले असल्याची माहिती देण्यात आली आहे. मात्र गाथेची एक प्रत उतरवून घेण्यासाठी (डोउनलोड) करण्यासाठी दिलेली आहे. ती पाहण्यासाठी आपल्याला 'डीवीटीटी योगेश' हा टंकही उतरवून घ्यावा लागतो.

गाथेत ज्या अभंगांत पक्ष्यांचे उल्लेख आलेले आहेत ते अभंग 'पक्षी' ह्या विभागात पक्ष्यांच्या नावाप्रमाणे संकलित केले आहेत. सोबत त्या पक्ष्यांची रंगीत छायाचित्रेही दिली आहेत. दि० के० बेडेकर ह्यांनी एका लेखात तुकोबांच्या अभंगात लघुकथा कशी साकारली आहे हे दाखवून दिले होते. त्यापासून प्रेरणा घेऊन तुकोबांच्या अभंगातील तीन लघुकथा 'लघुकथा' ह्या विभागात दिलेल्या आहेत. त्यांपैकी एका अभंगातील लघुकथा रंगीत चित्रांनी सजवलेली आहे. 'अभंगरूपी चित्र' ह्या विभागात भास्कर हांडे ह्यांनी काढलेले 'सुंदर ते ध्यान' ह्या अभंगावर आधारित चित्र पाहायला मिळते.

'चरित्र' ह्या विभागात श्रीधर मोरे देहूकर ह्यांनी तुकोबांच्या अभंगांचा आधार घेऊन लिहिलेले तुकोबांचे चरित्र दिले आहे. दि० पु० चित्रे ह्यांनी करून दिलेला लेखकाचा

परिचय आणि ह्या चरित्रात आलेल्या अभंगांचे संकलनही इथे पाहायला मिळते. 'विश्वकोश' ह्या विभागात 'लाँगमन अॅन्थॉलॉजी ऑफ वर्ड लिटरेचर' ह्या ज्ञानकोशात भाषांतरित रूपात समाविष्ट झालेल्या नऊ अभंगांचे मूळ मराठी अभंग दिलेले आहेत. 'पुस्तक' ह्या विभागात बाबाजी गणेश परांजपे ह्यांचे 'श्री तुकोबारायांचे अभंग' आणि भालचंद्र नेमाडे ह्यांचे 'तुकारामगाथा (निवडक अभंग)' ही दोन पुस्तके उपलब्ध करून दिलेली आहेत. लेख ह्या विभागात विविध लेखकांचे तुकोबा आणि त्यांचे साहित्य ह्या विषयावरील लेख संकलित केले आहेत. 'कविता' ह्या विभागात सुरेश भट, डॉ० राजा दीक्षित, अमोल बागूल ह्यांच्या कविता संकलित केल्या आहेत. 'भजनश्रवण' ह्या भागात तुकोबांच्या काही अभंगांची श्राव्य मुद्रणे उपलब्ध करून देण्यात आली आहेत. 'तुकारामबीज' ह्या विभागात संदेश भंडारे ह्यांची छायाचित्रे आणि 'पालखी' ह्या विभागात त्या छायाचित्रांसह वारीची ध्वनिचित्रमुद्रणे पाहायला मिळतात. 'देहूदर्शन' ह्या विभागात देहूच्या परिसराचा सचित्र परिचय करून दिलेला आहे. 'रंगभूमी' ह्या विभागात दि० बा० मोकाशी ह्यांच्या 'आनंदओवरी' ह्या कादंबरीच्या अतुल पेठे ह्यांनी तयार केलेल्या रंगावृत्तीची संहिता आणि त्या नाटकाविषयीचे लेख देण्यात आले आहेत. 'कलादालन' ह्या विभागात सत्यजिय राय ह्यांनी काढलेल्या तुकोबांच्या रेखाचित्रासोबतच इतर कलावंतांची रेखाचित्रे पाहायला मिळतात.

'छत्रपती शिवाजी' ह्या विभागात तुकोबा आणि शिवछत्रपती ह्यांच्या संबंधांविषयीचे लेख आहेत. 'महात्मा गांधी' ह्या विभागात येरवड्याच्या कारावासात महात्मा गांधींनी तुकोबांच्या १६ अभंगांचा इंग्रजीत अनुवाद केला त्याची माहिती आणि त्या अनुवादाची संहिता उपलब्ध करून दिली आहे. शांतिनिकेतनातील ख्यातकीर्त चित्रकार नंदलाल बसू ह्यांनी रेखाटलेले तुकोबांचे रेखाचित्रही आपल्याला इथे पाहायला मिळते.

संकेतस्थळावरील इतर भाषांचे विभागही समृद्ध आहेत. त्या विभागांत कोणकोणती सामग्री आहे ह्या विषयीची सविस्तर माहिती 'संकेतस्थळाबद्दल' ह्या पानावर दिलेली आहे. संकेतस्थळाच्या निर्मितीमागील प्रेरणा, साहाय्य करणाऱ्यांची नावे ही माहिती ह्या पानावर उपलब्ध आहे. तुकोबांच्या साहित्याविषयी असे बहुभाषिक संकेतस्थळ तयार करावेसे वाटणे ही एक आनंददायी गोष्ट आहे. मराठीतील इतरही साहित्य असे बहुभाषिक स्वरूपात महाजालावर उपलब्ध व्हावे हीच सदिच्छा हे संकेतस्थळ पाहिल्यावर व्यक्त करावीशी वाटते.

■

# शिव्यांची शिकवण

- रवींद्र भट्ट

अनुवादक - अ०रा० यार्दी

त्या दिवशी निरंजन खूप रागावला होता. आईवर तर तो खूपच संतापला होता. त्याच्या मनात आईला खूप शिव्या घालायच्या होत्या. पण त्याला एकच शिवी येत होती. ती म्हणजे 'मूर्ख.' त्याने एकदा आईला 'मूर्ख' म्हटले; पण तेवढ्याने त्याचे समाधान झाले नसावे. त्याने आपले इवलेसे हात तिच्या तोंडाजवळ नेले आणि तो मूर्ख...मूर्ख... असे घोकू लागला. तरीही त्याचे समाधान झाले नाही. त्यापेक्षा सणसणीत शिवी हवी, असे त्याला वाटत होते. सबंध घरभर धावला, पुन:पुन्हा आईजवळ धावला, आला, थांबला. त्याने आईला उद्देशून 'मूर्ख', 'महामूर्ख' म्हटले. तरीही त्याचे समाधान झाले नाही. तो फार अस्वस्थ होता. त्याला काहीतरी हरवल्यासारखे वाटत होते.

तो सोफ्यावर चढून बसला. तिथून तो घराबाहेर गेला. स्वैपाकघरात गेला. आजीजवळ गेला. शेवटी माझ्याकडे येऊन म्हणाला, 'आई महामूर्ख आहे. मी तिच्याबरोबर बोलत नाही, जा.'

मी पहिल्यापासून त्याचा राग पाहात आलो आहे. आईवर रागावण्यासाठी त्याला शब्द मिळत नसल्याचे माझ्या लक्ष्यात आले होते. मी त्याला सावकाशपणे माझ्याजवळ बोलावून घेतले आणि विचारले, 'का बाळा, आईनं काय केलं तुला?'

''आई मूर्ख... मूर्ख... मूर्ख...' तो पुन्हा म्हणाला.

''होय, आई मूर्ख आहे. पण, आई मूर्ख का?' मी विचारले.

''ती मूर्खच नाही, तर महामूर्ख आहे.' तो म्हणाला.

त्या वेळी माझी खात्री पटली. आईला 'मूर्ख' ही शिवी त्याला पुरेशी वाटत नसल्यामुळे तो अस्वस्थ होत होता.

''होय. आई नुसती मूर्खच नाही, तर ती भोस... आहे.' मी म्हणालो.

ते त्याला कळले नाही. त्याने 'भोस...' हा शब्द आणि त्याचा अर्थ विचारला.

'भोस... म्हणजे मोठी शिवी' मी म्हणालो.

त्या वेळी त्याच्या चेहेऱ्यावर समाधानाचे तरंग पसरले. त्याचे डोळे विस्फारले. त्याने एकदा माझा चेहेरा न्याहाळला. तो थेट स्वैपाकघरात गेला. ''आई, तू भोस..., महाभोस... आहेस'' असे म्हणाला.

आपल्या मुलाच्या तोंडी हा शब्द आलेला ऐकून माझ्या बायकोला धक्काच बसला.





अनुक्रमणिका

'कुणी शिकवलं रे तुला?' असे म्हणून तिने त्याच्या थोबाडीत दिली. तो जोराने रडायला लागला.

'ही शिवी कुणी शिकविली रे तुला?' असे विचारत ती त्याला मार-बडव करत होती. ''बाबांनी सांगितलं. 'तू भोस..., तू भोस...', त्याने रडत रडतच सांगितले. माझ्या बायकोचा राग अनावर झाला. तिने त्याला स्वैपाकघरातून फरफटत ओढून आणले नी माझ्यासमोर उभे केले. ती संतापाने म्हणाली, ''काय हो, काहीही समजत नसलेल्या मुलाला असल्या शिव्या शिकवता!''

'होय... अगं! तुला रागावण्यासाठी त्याला शब्दच मिळत नव्हता. म्हणून त्याला 'भोस...' हा शब्द शिकवला मी!'' मी सांगितले.

''अहो, ही काय बापानं मुलांना शिकवण्याची गोष्ट आहे काय हो?'' असे विचारत ती रागाने तरातरा आत निघून गेली.

तिचे डोळे पाण्याने डबडबले होते. चेहेरा संतापलेला दिसत होता. आपण रात्रंदिवस खस्ता खाऊन, गेली चार वर्षे, त्याला बोलता यावं म्हणून धडपड केली. आणि हे त्याला शिव्या शिकवतात. तिचे फणफणणे चालले होते.

ती माझे किंवा निरंजनचे काहीच ऐकण्याच्या मन:स्थितीत नव्हती. मीही गप्प बसलो. निरंजनबरोबर खेळू लागलो. तोपर्यंत म्हणजे निरंजनचा राग उतरला होता. आता तो नेहमीसारखा शांत झाला होता. आईवर रागावण्यासाठी त्याला एक नवीन शब्द मिळाला होता ना! आईच्या हातचा मार तो केव्हाच विसरून गेला होता. पण माझ्या हिचा राग मात्र सबंध दिवस उतरला नव्हता. तो दिवस असाच उलटून गेला. रात्री झोपताना माझ्या हिने पुन्हा तो विषय काढला. ती पुन्हा रडू लागली. ''नव्हे हो, त्याला तुम्ही 'भोस...' ही शिवी शिकवलीत; हे चांगलं का? त्याला काय कळतंय? उद्या तो सगळ्यांच्यावर त्याचा प्रयोग करेल. एकदा हे झालंय तेवढं पुरे नाही का?'' तिने विचारले.

मागे एकदा असेच झाले होते. दिवाळीसाठी माझी बहीण आणि तिचे मिस्टर आले होते. तेव्हा निरंजनला अजून तितकेसे बोलता येत नव्हते. तो काय बोलत होता, ते दुसऱ्यांना लगेच कळत नव्हते. दुपारच्या जेवणानंतर सगळेजण हॉलमध्ये बसून पानसुपारी खात होतो.

माझे मेहुणे आणि बहीण हे सोफ्यावर बसले होते. निरंजन त्यांच्याच शेजारी एका खुर्चीवर बसला होता. एकदम त्याने माझ्या मेव्हण्याला म्हटले, 'मूर्ख.' तो नवीन शब्द आदल्या दिवशीच तो शाळेत शिकला होता. मूर्ख कावळ्याच्या गोष्टीतून त्याने तो शब्द आत्मसात केला होता. माझ्या मेव्हण्याला बघून त्याने तो उच्चारला खरा; पण तो काय म्हणत होता, हे कुणाच्याच लक्षात येत नव्हते. पण ते माझ्या बायकोच्या लक्षात आले. 'ए निरंजन! गप्प बैस.' तिने त्याला दटावले. पण माझा मुलगा तिचे ऐकण्याच्या





अनुक्रमणिका

मन:स्थितीत नव्हता. पुन्हा त्याने मेव्हण्याकडे बघून 'मूर्ख' म्हटले. तेव्हा मात्र दीपाला राहवले नाही. ती त्याला मारायला गेली. पण तेवढ्यात निरंजनला काय म्हणायचे होते ते माझ्या बहिणीला - भारतीला - कळले. तिने माझ्या बायकोला थांबविले आणि ती म्हणाली, ''त्यानं काही चुकीचं म्हटलं नाही गं! ते मूर्ख नसते तर त्यांनी माझ्याबरोबर लग्न केलं असतं का?'' असे म्हणत तिने चेष्टा केली.

'होय, होय' म्हणत मेव्हण्याने तिच्या अभिप्रायावर शिक्कामोर्तब केले! निरंजनला उचलून घेत त्याने विचारले, ''का रे, मला मूर्ख म्हणतोस?'' आणि त्याच्या केसांतून हात फिरविला.

''मूर्ख कावळ्याची गोष्ट ऐकून मुलानं त्याचा तुमच्यावर प्रयोग केला'' असे सांगत माझ्या हिने त्यांची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. खरेतर माझ्या बहिणीने किंवा मेव्हण्याने त्याने मूर्ख म्हटल्याबद्दल वाईट वाटून घेतले नव्हते. उलट, त्यांना आनंदच झाला होता. शेवटी, आपण शिकलेल्या शब्दांचा दुसऱ्यांबरोबर बोलताना वापर करण्याइतपत निरंजन शहाणा झाला, या गोष्टीचे त्यांना खूप कौतुक होते. पण माझ्या हिचे मात्र समाधान झाले नव्हते.

हा प्रसंग दीपाने मला पुन्हा एकदा ऐकविला, ''हे बघा, त्याला काही कळत नाही. यापुढं तो कुणालाही 'भोस...' म्हणेल. आपल्या घरी कुणी ना कुणी येत असतं. त्यांच्यासमोर यानं ही भाषा वापरली तर काय होईल? मुलांना काय शिकवावं आणि काय शिकवू नये, हे कळतच नाही तुम्हाला.'' तिने मला चांगलेच फैलावर घेतले.

मी गालातल्या गालात हसत होतो. ते बघून तिच्या तळपायाची आग मस्तकाला पोचली. अस्वस्थतेचा झरा फुटला. हीच वेळ योग्य असल्याचे बघून मी तिला समजावण्याचा प्रयत्न केला. ''आता त्याला फक्त 'वाईट' एवढाच एक शब्द शिकवलाय. त्याला त्यापेक्षा घाणेरड्या शिव्या शिकवणार आहे.'' मी म्हणालो, ''रां...च्यापासून ते सगळं शिकवणार आहे.'' मी अधिक स्पष्ट केले.

''शिकवा, शिकवा. त्याचा उद्धार होऊ दे.'' म्हणत ती पुन्हा संतापली.

''होय, याच्यामुळंच खरा उद्धार होणार आहे. का म्हणजे, इतके दिवस तू रोज त्याच्याबरोबर शाळेला जात होतीस. दिवसाचे चोवीस तास तू त्याच्याबरोबरच असायचीस. त्याला कुणी शिवी दिली तर ते तुला कळत होतं. तू त्यांना दटावायचीस. पण आता तसं नाही ना. तो चार-चौघांच्या शाळेला चाललाय. तू तिथं असणार नाहीस. आपला मुलगा सगळ्या मुलांसारखा नॉर्मल असता, तर त्याला शिव्या शिकवण्याची गरज पडली नसती. त्यानं एखादा वाईट शब्द उच्चारला असता तर आपणच त्याला दटावून गप्प बसवलं असतं. पण, आता तसं नाही. त्याच्या कानांना ऐकू येत नाही. कुणी तरी त्याला शिव्या दिल्या तर त्याला कळतपण नाही. ती शिवी आहे, हेही त्याला कळत

नाही. तो त्यावर कोणतीच प्रतिक्रिया देत नाही, हे त्याच्या वर्गमित्रांना कळालं तर उद्यापासून रोज ते त्याला भो...च्या म्हणूनच हाका मारतील. त्याला हिणवतील. मग पुढं कधीतरी त्याला 'भो...च्या' या शब्दाचा अर्थ कळला तर त्याला फार वाईट वाटेल. मनानं तो खचूनही जाऊ शकतो. म्हणून आपण त्याला आत्ताच शिव्या शिकवल्या तर, त्याला कुणीतरी शिवी दिली तर ती शिवी असल्याचं त्याला कळेल. मग लगेच तो त्यावर प्रतिक्रिया देईल.''

''उद्या तो मलाच 'भो...च्या' म्हणेल, मुलाकडून असली शिवी खायची पाळी येईल, हे माहीत असूनही आपण त्याला ती शिकवलीच पाहिजे. आपण त्याला बोलायला शिकवलं, तेही असंच ना! हेही एक शिक्षणच आहे असं समज. आपण आपल्या मुलाला घरच्या मुलासारखं वाढवत नाही आहोत. त्याला आपल्याला समाजाच्या प्रवाहात सोडायचं आहे. तिथं चांगलंही आहे, वाईटही आहे. दोन्ही गोष्टी आपण त्याला शिकवल्या पाहिजेत.'' मी दीपाला समजावून सांगितले.

तेव्हा माझ्या हिला परिस्थितीचे गांभीर्य कळले. मुलाला चांगले तेवढेच शिकवून पुरेसे नाही, वाईटही शिकविले पाहिजे, हे तिला पटले. गेली चार वर्षे ती निरंजनाला बोलायला शिकवीत होती. पण, त्याला शिव्या शिकविण्याची कल्पनाच तिला सहन झाली नाही.

''तुम्ही म्हणता ते खरं आहे. पण माझ्याकडून शिव्या शिकवणं व्हायचं नाही. मी बोलायला शिकवलं, तुम्ही शिव्या शिकवा.'' ती म्हणाली.

''तेही मी शिकविण्याची गरज नाही. निकेतनला सांगितलं तर तो शिकवेल. गाढव, कुत्रा, माकड या सगळ्या लहानशा शिव्या, भो...च्या, रां...च्या असल्या शिव्या वाईट, हे त्याला समजावून सांगितलं पाहिजे. या शिव्यांचा तू स्वत: होऊन कुणावर प्रयोग करू नकोस. पण तुला कुणी असं म्हटलं तर त्या शिव्या असतात, हे समजावून घे.'' मी म्हणालो. हा विषय तिथेच संपला. माझ्या मोठ्या मुलाने - निकेतनने - आपल्या छोट्या भावाला भरपूर शिव्या शिकविल्या. काही शिव्या तर त्याच्याकडून लिहवून घेऊन शिकवाव्या लागल्या. शाळेत निरंजनला कुणी घाणेरड्या शिव्या दिल्या की काय, ते आम्हाला कळाले नाही. पण त्याने मात्र अधूनमधून आपल्या आईवर, भावावर गाढव, कुत्रा या शिव्यांचा प्रयोग केला.

■

['मूरने किवि' (तिसरा कान) या आत्मकथनपर कन्नड पुस्तकातून]





अनुक्रमणिका

# बोलसवयी

-शरदिनी मोहिते

जीवनात नेहमीच कोणाचा ना कोणाचा कोणाशी ना कोणाशी तरी संवाद होत असतो. कधी सहज, तर कधी कामानिमित्त, कधी हुरहुर दाटून आली म्हणून तर कधी अचानक कळलेली एखादी विशेष गोष्ट, किंवा गंमतही ऐकवण्यासाठी... कधी कधी तर उगीचच!... कारण माणसाला कोणाशी तरी आपली भेट व्हावी असं वाटत असतं... मग ती भेट संवादाद्वारे का होईना! दूरध्वनीवरून किंवा मोबाईलवरून कोणाशी बोललं तर बरं वाटतं. काही व्यक्ती इतक्या उमद्या असतात, उत्फुल्ल असतात की त्यांच्याशी थोडं जरी बोललं, त्यांचा आवाज कानावर पडला की एकदम छान वाटतं. उदासी असेल तर ती पळून जाते. मन हलकं होतं... काहीतरी दिलासा, काहीतरी प्रेरणाही मिळून जाते... ह्या हव्याहव्याशा गोष्टीसाठी त्या व्यक्तीशी मग दोन-चार शब्द तरी बोलण्याचा योग यावा वाटतो, मग त्या योगाचीही वाट पाहिली जाते... बोलण्यात येणाऱ्या त्या व्यक्तीच्या हेलकाव्यांची, आवेशाची किंवा तिच्या बोलण्यातल्या लकबींचीही आठवण होते.

मुद्दाम प्रयत्न न करता, आपोआपच ऐकणाऱ्याला, कधी विचित्र वाटल्या तरी, सहजी आवडून जाव्यात, सवयीच्याही होऊन जाव्यात अशा बोलसवयींची, उद्गारांची, शब्दसमुच्चयांची कधीकधी आठवण होते...

बऱ्याच जणांच्या बोलण्यातून अशा काही लकबी आढळतात. पाहू जाता त्यांचा त्या वाक्यात अर्थाअर्थी संबंध दाखवता येणार नसला तरी, त्या व्यक्तींना काही शब्द वरचेवर, पुन:पुन्हा ठरावीक अंतरानेच नव्हे, तर केव्हाही बोलण्याची सवयच पडून गेलेली असते. आपसूकच त्यांच्या तोंडून ते शब्द बाहेर पडत रहातात; असं होत राहिलं की मग ऐकणाऱ्यालाही ते शब्द त्या बोलणाऱ्या व्यक्तींच्या संदर्भात जणू परवलीचे होऊन जातात... एकप्रकारे ते त्यांची जणू ओळख बनून जातात... आणि सहज जरी कोणा दुसऱ्या एखाद्याच्या तोंडी तसे शब्द आलेले ऐकले की त्या त्या तमुक व्यक्तीची आठवण झाल्याशिवाय राहात नाही... म्हणजे अशीही एकप्रकारची ओळखजुळणी होऊन गेलेली असते!

आमचे एक काका बोलताना नेहमी म्हणायचे, ''ऐकून घे...'' आणि आपण ऐकत असलो, आणि आपण ऐकतोय हे त्यांनाही माहीत असलं तरी त्यांचं बोलणं पुरं





अनुक्रमणिका

होईपर्यंत पुन:पुन्हा 'ऐकून घे' ऐकावं लागायचं. अशीच गोष्ट आमच्या एका भावाच्या 'कळलं का'बाबत व्हायची...

अशाच प्रकारे पुढील शब्द समुच्चय कोणा ना कोणाच्या बोलण्यात ऐकू येत राहतात.

'माझं आधी ऐक', 'ऐक ना!', 'ऐकलं का?', 'काय सांगितलं?', ('सांगते ऐका' म्हणायला तमाशातली नायिकाच असायला पाहिजे असं नाही!)

खरं बोलणं, खरा विषय सुरू होण्याआधी अशा प्रकारचा पूर्वरंग अनेकांकडून उमटत असतो - 'काय ऐकशील?' अशी उत्सुकता निर्माण करत मग काहीतरी थोडं बोलणं झाल्यानंतर 'काय म्हणते मग मी?' अशी खरंच ऐकलं जातंय याची खातरजमा होते, आणि 'काय म्हणता!' अशी दाद मिळून जाते.

संवाद मग अशा काही बोलांतून आणि प्रतिक्रियांमधून चालत रहातो-

'काय म्हणता?', 'चल!', 'झाऽऽलं!', 'बरं का?', 'काय तर', 'काय तरीच!', 'अरेच्चा!', 'किनई...', 'कळलं का?', 'काय समजले?', 'समजून घे', 'समजलं का?', 'अगं बाई!', 'बाई गं!', 'बाऽऽई!', 'बाई बाई...', 'काय?', 'हो का?', 'काय की!', 'मी काय म्हणतो', 'काय सांगू', 'काय सांगायचं?', 'काय काय आणि काय काय!...', 'नाही तर काय!', 'होतंय की!', 'हो', 'हो ना', 'हो... हो... हो... हो...', 'हे कितीतरीदा!', 'छे!' 'छे छे!', 'छे छे छे', 'कम्माल!', 'कमाल आहे', 'कमालेऽ!...', 'कमालच ना!'..., 'कमालच की!'..., 'हा त् कशी' किंवा 'हाऽऽत कशी!'...

आमच्या एका वहिनींच्या तोंडी कायम 'शंकर शंकर'... कळायचंच नाही यांची अमुक बाबतीत काय प्रतिक्रिया!

कधी ऐकणारा म्हणतो, 'राम राम!' कधी 'हरे राम!' कधी 'अरे रे'... (यातला 'रे' कितीही वेळा!) निराशा किंवा अपेक्षाभंग करणारा हा शब्द, कधी कधी भलत्या वेळीही उमटू शकतो! सवयच पडली ना!... पण सवय पडलेली असली तरी बोलणाऱ्याला वाटू शकतं एवढी आनंदाची बातमी मी सांगितली; पण ती यांना आनंद देत नाही की काय?

काही जणांच्या तोंडून सतत 'वा!', 'वा वा' किंवा 'वा वा वा!' बाहेर पडत असतं! आणि सहानुभूतीच्या अपेक्षेत असणारी व्यक्ती त्या 'वा! वा!' वाल्याला हेटाळणीयुक्त 'वा!' म्हटल्याशिवाय राहू शकत नाही. ■

# भावना टांगायला आशयाच्या खुंट्या

-राजीव साने

'वड्याचे तेल वांग्यावर' ही म्हण एकाचा राग दुसऱ्यावर काढणे यासाठी वापरली जाते. कनिष्ठ हे वरिष्ठावरचा राग बायकोवर काढतात (आणि कदाचित मुळात वरिष्ठ बायकोवरचा राग कनिष्ठावर काढत असतात !) हे प्रसिद्धच आहे. भावनेने असे 'विषयांतर' करणे, फक्त क्रोध या एकाच भावनेबाबत खरे आहे असे मात्र अजिबात नाही. ते सर्वच भावनांबाबत खरे आहे. भयग्रस्ताला कशाचेही भय वाटू लागते वा चिंताग्रस्ताला कशाचीही चिंता वाटू लागते. विनोदी कार्यक्रमात एकदा दणदणीत विनोदाने हशा घेतला, की नंतर अगदी किरकोळ विनोदही त्यांच्या मानाने मोठे हशे घेऊ लागतात. ज्याप्रमाणे स्थिरचित्रांची मालिका ही दृष्टिसातत्यामुळे चलच्चित्र म्हणून प्रत्ययाला येते, त्याप्रमाणे भावनासातत्य हेसुद्ध बरेच 'भ्रम' घडवत असते.

आपल्या मनात जेव्हा कोणतीही भावना निर्माण होते, तेव्हा ती बहुतेक वेळा, कशातरी विषयीची भावना म्हणून उद्भवते. तिला काही एका विचाराचा आशय प्राप्त झालेला असतो. सहसा आपण असेच गृहीत धरून चालतो, की आशय हीच भावना आहे. इंग्लिशमध्ये विविध आशयांना 'फीलिंग्ज', प्रत्यक्षात व्यक्त झालेल्या आवेगांना 'इमोशन्स', मनात साठवून ठेवलेल्या मनोवृत्तींना सेंटिमेंट्स' आणि त्या-त्या वेळच्या (संमिश्र) आवेगप्रवणतेला 'मूड' असे वेगळाले शब्द आहेत. त्याने मला मुद्दामच ओळख दाखवली नाही' असे वाटणे हे 'फीलिंग' आहे. 'अपमानाने दुखावले जाऊन होणारा चडफडाट' ही 'इमोशन' आहे, 'आपल्याला साला कोणी किंमत देत नाही. हे समजतात कोण स्वत:ला?' ही केव्हाही वाजू शकणारी जी 'रेकॉर्ड' असते ती 'सेंटिमेंट' असते. आणि फटकन अपमान होऊ शकेल असा 'मूड' असतो. मराठीत सगळ्याच गोष्टींना 'भावना' हा एकच शब्द आहे, हे दुर्दैवी आहे. वरील भेद करण्याची भाषेत सोय नसल्यामुळे या साऱ्याचे नेमके आकलनच होत नाही व दिशाभूल होते.

आशयामुळे आवेग (फीलिंगमुळे इमोशन) उत्पन्न होतो, हे अर्धसत्य आहे. पण सत्याची उरलेली बाजू अशीही आहे, की आवेग उत्पन्न करण्याच्या त्या-त्या वेळच्या गरजेपोटी आपण निमित्ते शोधत असतो. कल्पित कथा रचण्याची डाव्या मेंदूची क्षमता इतकी वेगवान असते, की ती 'रचलेली' कल्पित कथा आहे असे न वाटता 'घडलेली' घटनाच 'तशी' अनुभवास येते. म्हणजेच आवेगानुसार आशय बनविला जातो. आपण

साठवलेल्या सेंटिमेंटमध्ये 'कारण' असू शकते आणि घटना हे फक्त 'निमित्त' असू शकते. सेंटिमेंट्स नावाची ही 'समृद्ध अडगळ' वेळोवेळी काढून टाकता आली पाहिजे. पण हेही पुरेसे नसते. आपल्या जाणिवेच्या पुढ्यात निरनिराळे आशय असतात; पण जाणिवेला तिच्या मागून आकार देणारे 'पडद्यामागचे कलाकार' म्हणजे 'मेंदूतील रसायने व हार्मोन्स' हे शारीर घटकही कार्यरत असतातच. साधे उदाहरण घ्यायचे तर, जेव्हा पोटात मळमळत असते तेव्हा हवालदिल वाटते. हवालदिल असताना किरकोळ कृतीही मोठे आव्हान वाटते, तसेच उलटपक्षी जीवनातील प्रसंगाचा आशय खरोखरच हवालदिल करणारा असेल तरी गरगरून मटकन खाली बसणे अशी शारीर प्रतिक्रियाही उमटू शकते. मेंदूतील रसायने व हार्मोन्स या गोष्टी 'प्रसंगा'च्या वस्तुनिष्ठ मूल्यमापनाशी अचूक प्रमाणातच उत्पन्न होतील असा 'परिपूर्ण - निरोगी' माणूस क्वचितच आणि क्वचित प्रसंगीच असू शकतो. खरेतर मनोशारीरिक आणि तनूमानसिक या दोन्ही दिशांनी घडणाऱ्या क्रियांविषयी बरेच ज्ञान निर्माण झालेले आहे; पण ते लोकांत पोचलेले नाही आणि रुजलेले तर नाहीच नाही. हे दारिद्र्य दूर केले पाहिजे.

आपले आवेग विषयांतर करू शकतात हे ध्यानात ठेवून झटकन काढलेले निष्कर्ष तपासून पाहण्याची गरज असते. त्यासाठी वेळ जाऊ द्यावा लागतो. आपल्या विचारात पूर्वग्रहदूषितपणा कुठे-कुठे येतो याची अभ्यासपूर्वक जागरूकता कमवावी लागते, तसेच अनावश्यक आणि नुसताच ताप देणाऱ्या भावना, 'तशाच उगाळल्या जात नाहीत ना' हेही सतत पाहावे लागते. या अंगाने पाहता 'विषयांवर' हे एक दौर्बल्य ठरते.

पण हीच विषयांतरक्षमता आपली शक्तीही ठरू शकते! जे प्रयोजन (पर्पज) असफल होते आहे, त्याच्या मागची प्रेरणा (मोटिव्ह)सुद्धा विषयांवर करूनच वेगळ्या प्रयोजनाच्या मागे जुंपता येते किंवा प्रेरणेला अनुरूप असे वेगळे प्रयोजनही शोधता येते. अशा फेरजोडण्या करता येण्याने आपल्या प्रेरणा व प्रयोजने पूरक ठरून, आपण जास्त बाबतीत साफल्य अनुभवू शकतो. दुःखात मानसिक ऊर्जेचे क्षरण (एक्झॉश्शन) होत असते; पण सुखात तिचे पुनर्भरणही (रिकूपमेंट) करता येते, पण सुख नुसतेच भोगून नव्हे! सुखात जो अवसर मिळतो त्याचा उपयोग प्रेरणा आणि प्रयोजने सम्यक करून घेण्यासाठी करता आला पाहिजे. ही कला जितपत साधते, तितपत आपण मानसिकदृष्ट्या 'स्व-तंत्र' बनतो. हे सारे समजण्यासाठी श्रम घेण्याची गरज आहे. नाही तर 'चांगले' (?) विचार मनात आणा म्हणजे मनही चांगले राहील' अशा द्विरुक्तीपूर्ण सल्ल्यांमधून फार तर सल्ले ऐकताना 'चांगले' वाटेल इतकेच.

दै० लोकसत्ता | 22.2.2014 | 'दै०लोकसत्ता'

# दारे बंद न करणारी भाषा

**-आसाराम लोमटे**

भाषेला जेव्हा जेव्हा मखरात बसविण्याचा प्रयत्न होतो, तेव्हा ती गुदमरते. संकोच होतो तिचा. वाहत्या पाण्यासारखी भाषा या मुलखातून त्या मुलखात जाते. जिथे छापील अक्षरांचा गंधही नाही अशा ठिकाणी भाषेचे हे जिवंतपण नजरेत भरते. पुस्तकातली भाषा व्याकरण महत्त्वाचे मानते आणि ही लोकांची भाषा अंतःकरण.

ज्या परिसरात ही भाषा व्यवहारात असते त्या परिसरातील स्थानिक संदर्भ भाषेत असतात. जणू त्या मातीचे गुणधर्म घेऊनच ही भाषा अवतरते. ज्या समूहात ही बोली बोलली जाते त्या समूहाच्या असंख्य परंपरा, रूढी, चालीरिती, संकेत यांना घेऊनच भाषेचा संसार चाललेला असतो. भाषा भेदभाव नाही करीत किंवा आपल्या अवकाशात कोणी शिरू नये म्हणून दारेही बंद करून नाही ठेवीत. बऱ्याच गोष्टी पोटात सामावून ती वाहत असते नदीच्या पुरासारखी. वाहत्या पुरात जशा असंख्य गोष्टी असतात, किनाऱ्यावरचे आत ओढले जाते आणि प्रवाह तसाच पुढे जात राहतो तसे भाषेच्या पोटात काय काय सामावलेले असते. भाषा बारा कोसांवर बदलते असे म्हणतात, पण ती जिथे बदलते तिथे कुठली सीमारेषा असते असे नाही आणि बदलाची कोणतीच दृश्य अशी ठळक खूणही आढळत नाही. वाहत्या हवेसारखेच जणू सगळे काही. कुठे रेघ मारता येत नाही आणि भेदही करता येत नाही. ■

दै० लोकसत्ता, दि० ११-०८-२०१४

### काव्याचा जन्म, गद्याचा जन्म

साहित्य अकादमीचं कार्य वाङ्मयाला प्रतिष्ठा मिळवून देण्याचं आहे; भाषांना मान्यता देण्याचं नाही... भाषांना भाषा म्हणून वेगळी मान्यता नव्हती, त्यांची लिपीदेखील तयार झाली नव्हती; तेव्हा फार श्रेष्ठ काव्ये लिहिणारे कवी झाले. होमर, वाल्मिकी, वेदव्यास इत्यादी. आपल्या आजच्या परिभाषेत बोलायचं तर त्यांच्या काळी भाषा मागासलेल्या प्राथमिक अवस्थेत होत्या; पण काव्य तेव्हाच जन्माला येतं. चांगल्या गद्याचा जन्म मात्र आधुनिक काळात भाषेला शिस्त, वळण लागल्यानंतर होत असतो.

यू० आर० अनंतमूर्ती, (साप्ताहिक साधना, १३-९-१४, पृष्ठ २६)





अनुक्रमणिका

दखलयोग्य

# फॉण्टची मुक्त दुनिया

नीरज पंडित

संगणक तसेच मोबाइलवरही भारतीय भाषांचे अनेक फॉण्ट उपलब्ध आहेत. पण प्रत्येक फॉण्टमध्ये काही ना काही त्रुटी आहेच. यामुळे नवनवीन फॉण्टची निर्मिती होत असते. आयआयटीमधील इंडस्ट्रिअल डिझाइन सेंटर(आयडीसी)मध्ये फॉण्टवर काम करणाऱ्यांनी 'एक मुक्त' नावाच्या फॉण्टची निर्मिती केली आहे. हा फॉण्ट सध्या बाजारात असलेल्या फॉण्टच्या तुलनेत खूपच वेगळा आहे. आयडीसीमध्ये दोन वर्षांपूर्वी 'एक टाइप' या प्रकल्पाची सुरुवात झाली. इंग्रजी आणि मराठी या दोन्ही फॉण्टमधील दिसणं खूप वेगळे असते. हे दिसणे एकच करण्याचे काम या टीमने केले आहे. या टीममध्ये प्रा० गिरीश दळवी, नूपुर दाते आणि सारंग कुलकर्णी यांचा समावेश आहे. या त्रयीने लिप्यांची परंपरा आणि त्यांचे व्याकरण लक्षात घेऊन फॉण्टची निर्मिती केली आहे. भारतीय फॉण्टला सध्या कोणतीही प्रमाणबद्धता नाही. ही प्रमाणबद्धता आणण्यासाठी या टीमने विशेष मेहनत घेतली आहे.

या फॉण्टची आणखी एक खासियत म्हणते तो वेब आधारितही आहे आणि छापण्यासही उपयुक्त आहे. तो युनिकोड आधारित असून त्यामध्ये दैनंदिन वापरातील अनेक चिन्हे देण्यात आली आहेत. या चिन्हांचा समावेश बहुतांश मराठी फॉण्टमध्ये दिसून येत नाही. अनेक मराठी फॉण्ट हे टाइप केल्यावर एक तर खूप लहान दिसतात किंवा खूप मोठे दिसतात. पण हा फॉण्ट इंग्रजी फॉण्टच्या अनुसारच दिसत असल्यामुळे लहान असला तरी तो वाचनीय होतो.

येणाऱ्या पिढीला टंकरचनेचा पाया सहज उपलब्ध व्हावा, टंकरचनाकार तांत्रिक गोंधळात अडकू नये यासाठी हे फॉण्ट मुक्त स्रोतात तयार करण्यात आल्याचे कुलकर्णी यांनी सांगितले. भारतीय लिपीतील टंकरचना हे अवघड काम आहे हा गैरसमजही यातून दूर केला जाऊ शकतो आणि अधिकाधिक टंकरचनाकार तयार होऊ शकतील, असेही ते म्हणाले. देवनागरी आणि लॅटिन फॉण्ट मुक्तस्रोतात बनविले गेल्यामुळे ते मोफत उपलब्ध आहेत. हे फॉण्ट http://www.google.com/fonts/specimen/Ek+Mukt या संकेतस्थळावरून डाऊनलोड करता येऊ शकतात. यातील देवनागरी फॉण्ट मराठी, हिंदी, कोंकणी, संस्कृत व नेपाळी या भाषांमध्ये टंकलेखन करण्यासाठी वापरला जाऊ शकतो. ■

दै० लोकसत्ता ३१-०५-२०१४



अनुक्रमणिका

# मराठीच्या अध्यापनासाठी

अन्यभाषकांना मराठी शिकवण्यासाठी मुंबई विद्यापीठाच्या जर्मन विभागाने पुढाकार घेतला आहे.

यासाठी शैक्षणिक साधनांची निर्मिती करण्याचे काम सुरू झाले आहे. यामध्ये एकंदर सहा स्तरावरील अध्यापन पुस्तके तयार करण्यात येणार आहेत. त्यापैकी पहिल्या टप्प्यासाठी उपयुक्त अशा पाठ्यपुस्तक, सरावपुस्तक आणि डीव्हीडीचे प्रकाशन १३ ऑगस्ट रोजी प्रसिद्ध अभिनेता आमीर खान यांच्या हस्ते झाले. याप्रसंगी आमीरने मराठीत भाषण केले. या प्रकल्पासाठी त्याने २५ लाख रुपयांची देणगी दिली व प्रकल्प पुढेही सुरू राहील अशी आशा व्यक्त केली.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक मराठी अभ्यास केंद्राचे प्रमुख प्रा० दीपक पवार यांनी केले. जर्मन विभागाच्या व या प्रकल्पाच्या प्रमुख प्रो० डॉ० विभा सुराणा यांनी प्रकल्पाची सविस्तर ओळख करून दिली.

विशेष अतिथी म्हणून जर्मनीचे कॉन्सल जनरल श्री० मिशाएल जिबर्ट उपस्थित होते. मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू डॉ० वेळूकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन प्रा० वीणा सानेकर आणि प्रा० सोनाली गुजर यांनी केले.

■

- आनन्द काटीकर

**भाषा, साहित्य, देशाची एकात्मता**

भाषिक साहित्याच्या परस्पर अभ्यासामधून देश जोडला जायला हवा होता. एकमेकांच्या भाषा आणि साहित्य-परंपरांची माहिती करून घ्यायला हवी.

-यू०आर० अनंतमूर्ती, 'साप्ताहिक साधना', पृ० ३२, १३-०९-२०१४



अनुक्रमणिका

प्रतिसाद १

# अल्विदा, सत्त्वशीलाताई, अल्विदा!

- यू० म० पठाण

भाषाविज्ञान हा तसा अनेकजणांना रुक्ष वाटणारा काहीसा नावडीचा विषय. या'जणां'मध्ये काही मराठीचे प्राध्यापकही गृहीत धरायला हरकत नाही. एकूण भाषाविज्ञानविषयक स्थिती आशादायक तर नाहीच पण चिंताजनकही आहे. महाराष्ट्रातील अनेक विद्यापीठांच्या मराठी विभागांत किती प्राध्यापक भाषाविज्ञानाचे तज्ज्ञ आहेत, हा एक संशोधनाचा विषय असू शकेल. पण त्यासाठी पीएच०डी०चा मार्गदर्शक मिळण्याची वानवा असण्याची शक्यता आहे.

अशा अवस्थेत कोणत्याही महाविद्यालयात वा विद्यापीठात नसलेले मराठी भाषेचे काही आस्थेवाईक अभ्यासक आहेत, तेवढेच तुरळक आशेचे किरण आहेत. सत्त्वशीलाताई सामंत त्यांपैकीच एक होत्या.

सत्त्वशीलाताईंना मी कधी पाहिलं नाही, ना त्यांची-माझी कधी गाठभेटही झाली; मात्र त्यांचे भाषाविषयक परखड पण पोटतिडिकीचे लेख मी यापूर्वी काही वर्षांत वाचले होते. एकदा त्यांनी स्वत:च मला दूरध्वनी केला व काही भाषाशास्त्रीय प्रश्नांविषयी चर्चा केली, त्यावरून त्यांची चिकित्सक सत्यान्वेषी मानसिकता मला जाणवली. त्यांच्या निधनानंतर त्यांच्याविषयीचे काही लेख आल्यावरच त्यांच्याविषयीची माहिती मला मिळाली.

त्या काळात मी दै. 'सकाळ'च्या 'सप्तरंगी' पुरवणीत मराठीत आलेल्या अरबी, फार्सी, तुर्की शब्दांविषयीचं 'जडणघडण' हे सदर लिहीत होतो व ते अत्यंत वाचकप्रिय झालं होतं. (हा काळ २०१०-११चा असावा.) माझा पूर्वपरिचय नसतानाही सत्त्वशीलाताई वेळोवेळी अशा प्रकारच्या शब्दांविषयी माहिती विचारीत व सखोल (तशीच प्रदीर्घ) चर्चाही दूरध्वनीवरून करीत; त्यावरून मला त्यांची या विषयाची जाण व त्यांचा प्रगल्भ व्यासंग जाणवला. जिथं माझं मत पटलं नाही, त्या वेळी त्या नम्रपणे पण सप्रमाण विरोधही करीत. त्यांची मला अशी पटलेली मतं मी मान्यही करीत असे.

ताईंचा नि माझा हा भाषावैज्ञानिक संवाद वाढला तो 'बालभारती'च्या पाठ्यपुस्तकांच्या निमित्तानं. म०रा० पाठ्यपुस्तक निर्मिती-मंडळ स्थापन झालं, त्या काळापासून म्हणजे सु० १९६८ पासून पुढं दोन दशकं मी या मंडळाच्या मराठी समितीवर होतो. यातील बऱ्याच मोठ्या काळात मी या समितीचा अध्यक्ष व विद्या-समितीचा (ॲकॅडेमिक कौन्सिल) सदस्य होतो. या समितीचे तत्कालीन सचिव (मराठी भाषा




अनुक्रमणिका

अधिकारी) श्री. राजगुरू यांनी मराठीच्या वर्णमालेविषयीचा एक वादग्रस्त लेख रविवार सकाळच्या 'सप्तरंग' पुरवणीत लिहून त्यात 'मराठीच्या वर्णमालेतील वर्णांची संख्या किती हे कुणालाच ठामपणे सांगता येणार नाही', अशा आशयाची काही अज्ञानमूलक व बेधडक विधानं केली होती. त्यांचा समाचार - तोही शास्त्रशुद्ध नि सप्रमाण तसाच परखड शब्दांत ताईंनी घेतला होता. त्यातील त्यांची मतं मला मान्य असल्यानं मीही या पुरवणीत माझी बाजू मांडणारा व 'बालभारती'च्या मराठी भाषा अधिकाऱ्यांच्या चुकीच्या व बेजबाबदार विधानांना विरोध करणारा लेख लिहिला होता. माझ्या आठवणीप्रमाणं ताईंच्या दोन लेखांची शीर्षकं 'बालभारती'चा बालहट्ट व 'बालभारतीचा राजहट्ट' अशी होती, तर माझ्या लेखाचं शीर्षक 'बालहट्ट', राजहट्ट वगैरे वगैरे' असं होतं. माझ्या लेखात मी मराठी भाषा अधिकाऱ्यांना त्यांच्या लेखातील अज्ञानमूल व बेजबाबदार विधानं/मतंही त्यांची वैयक्तिक मतं आहेत की पाठ्यपुस्तक मंडळाची अधिकृत मतं आहेत असंही विचारलं होतं. पण आमच्या या तिन्ही लेखांचं उत्तर या अधिकाऱ्यांनी वा मंडळानं दिलं नाही. स्वत: मराठी भाषा अधिकाऱ्यालाच मराठीच्या वर्णमालेत नक्की वर्ण किती, हे माहीत नसेल तर त्यांनी मराठी व अ-मराठी 'बालभारती'ची पहिली ते सातवीची पुस्तक संपादिली तरी कशी, असा माझा सवाल होता. संबंधित अधिकारी व मंडळ मूग गिळून बसल्यानं आम्ही दोघांनीही पुढं याविषयी काही लिहिलं नाही.

यानंतर पुढंही, आयुष्याच्या अखेरीपर्यंत, ताईंनी मराठीतील अनेक अरबी-फार्सी-तुर्की शब्दांबद्दल वेळोवेळी माझ्याशी दूरध्वनीवर चर्चा केली. त्यात 'टाळे' या शब्दाबद्दल मी 'सप्तरंग'मध्ये लिहिलं होतं, त्याबद्दल मतभेद व्यक्त करणारी दोन पत्रं 'सप्तरंग'मध्ये प्रसिद्ध झाली; पण ती 'सप्तरंग'च्या औरंगाबाद आवृत्तीत न आल्यानं मला कळली नाहीत. तेव्हा ताईंनी दूरध्वनीवर त्याविषयी माझ्याशी चर्चा केली व मी त्यांना या संदर्भातील माझी भूमिका सप्रमाण विशद केली. त्यांनीही ती समजूतदारपणे स्वीकारली. संस्कृत व फार्सी या दोन्ही भाषा एकाच आर्यवंशाच्या शाखा असल्यानं काही शब्दांत त्या दोन भाषांत साम्य आढळतं व संदर्भावरून त्यांची व्युत्पत्ती संस्कृत वा फार्सीपासून द्यावी लागते, हे माझं मत ताईंनी मान्य केलं होतं.

त्यांच्या विषयीचा शेवटचा एक प्रसंग लिहिल्याशिवाय मला हा लेख संपविता येणार नाही. त्यांच्या निधनापूर्वी दहा-पंधरा दिवस आधी त्या माझ्याशी एका अरबी शब्दाविषयी व त्यातील 'अल्' या अरबी उपसर्गाविषयी दोन-तीनदा दूरध्वनीवरून विचारीत होत्या. हा उपसर्ग लागलेले जे जे अरबी शब्द मराठीत आले, त्यांची त्यांना माहिती हवी होती. या ना त्या कारणानं मी हा तपशील लगेच देऊ शकलो नव्हतो. शेवटी त्यांचा तिसऱ्यांदा की चवथ्यांदा फोन आला, तोही अत्यंत विनम्र व सौज्वळ, सौजन्यपूर्ण भाषेत. (खरंतर त्यांनी रागवायला हवं होतं) मग मी त्यांना ती सर्व माहिती अरबी उदाहरणांसह दिली.

वारंवार याविषयी माहिती का विचारीत होत्या, तेही त्यांनी सांगितलं. त्या म्हणाल्या, 'सर, मी एका साप्ताहिकात गेल्या काही महिन्यांपासून शब्दांविषयीचं एक सदर तुमच्या 'जडणघडण' या सदराप्रमाणंच, लिहिते आहे. त्यासाठी ही माहिती हवी होती. मी काही कोश धांडोळले होते; पण तुमच्याकडून खात्री करून घ्यायची होती.'

मी विचारलं, 'कोणतं सदर लिहिताय तुम्ही?'

त्या म्हणाल्या, 'शब्दरंग.'

'अहो', मी म्हणालो, 'याच नावाचं सदर तर मी यापूर्वी एका दैनिकात लिहिलं आहे आणि हे पुस्तकही मुद्रणाधीन आहे.' 'मग मी त्या सदराचं नाव बदलू का?' त्यांनी विचारलं. 'मुळीच नाही. तुम्ही त्याच नावानं ते सदर चालू ठेवा. अल्‌विदा!'

यावर त्या हसल्या कारण याच शब्दाविषयी त्यांनी ही माहिती विचारली होती...

...'पण सत्त्वशीलाताई, तुम्ही इतक्या लवकर मात्र 'अल्‌विदा' म्हणायला नको होतं.

■

प्रतिसाद २

# पुन्हा एकदा छंद-विचार

नीलिमा गुंडी

स० न०वि०वि०

उन्हाळा एप्रिल २०१४ ह्या अंकातील शुभांगी पातुरकर यांच्या लेखातील काही चुकांनी लक्ष वेधून घेतले.

( १ ) त्यांनी पृ० ४१ वर चार ठिकाणीं दिलेले चिंतामणी पेटकर हे नाव चुकीचे आहे. मुळात चिंतामणीपेठकर (पेटकर नव्हे) हे सर्व आडनाव आहे. त्यांचे संपूर्ण नाव पांडुरंग व्यंकटेश चिंतामणीपेठकर असे आहे.

( २ ) त्यांच्या काव्याचे नाव गंगावर्णन असे नसून गंगावर्णना असे आहे.

( ३ ) लेखिकेने पृथ:करण असे चुकीचे शब्दरूप दोन ठिकाणी (पहा पृ० ३५ व ३६) वापरले आहे.

( ४ ) लेखिकेने छंद-विचार तर कधी छंदोविचार (पहा : शीर्षक आणि पहिली ओळ), तसेच कधी स्वप्रकाशित (पृ० ३८) तर कधी स्वयंप्रकाशित (पृ० ४७) अशी मुक्त (!) शब्दरूपे वापरली आहेत.





अनुक्रमणिका

( ५ ) लेखिकेने मुक्तशैली हा मुक्तछंदाचा उपप्रकार मानला आहे (पृ०४३). प्रत्यक्षात 'मराठी वाङ्मय कोश, खंड ४ : समीक्षा-संज्ञा' (संपादक : विजया राजाध्यक्ष)मध्ये मुक्तशैली ही नोंद स्वतंत्र आहे. त्यास मुक्तछंदाचा उपप्रकार असे मानलेले नाही.

( ६ ) आज मुक्तछंद मराठीत सर्रास रुळला आहे हे लेखिकेचे विधान मान्य करणे शक्य नाही. मुक्तछंद हा पद्यबंध आज कोण कवी वापरतात? लेखिकेने दिलेली सर्व उदाहरणे १९५० पूर्वीची आहेत. (लेखिकेने 'दोला', 'साधना आणि इतर कविता' 'पेर्ते व्हा', या कवितासंग्रहांचा प्रकाशनकाल दिलेला नाही; पण ते संग्रह १९५० पूर्वीचे आहेत, हे अभ्यासक जाणतात.) असो. ■

**प्रतिसाद ३**

# पुन्हा छंद-विचार

**- शुभांगी पातुरकर**

स० न०वि०वि०

'भाषा आणि जीवन'च्या उन्हाळा अंकातील (वर्ष ३२, अंक २, एप्रिल २०१४) माझ्या लेखातील काही मुद्यांबाबत नीलिमा गुंडी यांनी काही आक्षेप नोंदविले आहेत.

मुळात चर्चासत्रात वाचनासाठी तयार केलेल्या प्रस्तुत लेखात शुद्धलेखनाच्या काही चुका टंकलेखनसमयी राहून गेल्या असाव्यात. कारण वाचनसमयी त्या सुधारून घेण्यास वाव होता. श्री० चिंतामणी पेठकर यांचे पूर्ण नाव पांडुरंग व्यंकटेश चिंतामणीपेठकर आहे हे माहीत असूनही ते संपूर्णपणे लिहिले गेले नाही. कदाचित त्यामुळे माननीय संपादकांचा त्याबाबत गैरसमज झाला असावा. तथापि चुका दाखवून दिल्याबद्दल गुंडींचे आभार.

आता मुख्य मुद्याकडे वळू.

मुक्तछंद हा माझ्या अभ्यासाचा, संशोधनाचा विषय असल्याने कोणत्याही मान्यवरांच्या मतांचा अधिक्षेप न करता मी माझी भूमिका तेवढी इथे स्पष्ट करीत आहे. 'मराठी वाङ्मयकोश, खंड ४ : समीक्षा संज्ञा' (संपा० विजया राजाध्यक्ष)मधील नोंदीमध्ये मुक्तशैली हा मुक्तछंदाचा उपप्रकार मानलेला नसताना मी मात्र तसा मानते आहे यावर गुंडींचा आक्षेप आहे. वास्तविक तो घेण्याचे कारण नाही. कारण हा माझ्या वा मान्यवरांच्या मानण्या न मानण्याचा प्रश्न नसून माझ्या संशोधनोत्तर निष्कर्षाचा भाग आहे आणि जोपर्यंत एखाद्याचे विश्लेषण तार्किक कसोटीवर उतरते आहे तोवर त्याबाबत आक्षेप घेण्याचे कारण नाही. ज्ञानक्षेत्रात कुठलाच शब्द अंतिम नसतो. म्हणूनच कधीकधी मान्यवरांचे, पूर्वसुरींचे मतही अग्राह्य ठरते.





अनुक्रमणिका

मुक्तछंद आज सर्रास रुळलेला आहे किंवा नाही हा वाद आता रद्दबादल झाला आहे. दिवाळी अंकांतून प्रकाशित होणाऱ्या कविता, नित्य प्रकाशित होणारे नवे काव्यसंग्रह, वर्तमानपत्रांच्या पुरवण्या, मासिके यातून नजरेस पडणारी आजची कविता सहज जरी पाहिली तरी वस्तुस्थिती लक्षात येईल. उलट आक्षेप घ्यायचाच झाला तर मुक्तछंदाच्या सर्रास रुळण्याने आज कवींची संख्या भाराभर झाली आहे आणि निकृष्ट कवितेचे पीक वारेमाप फोफावते आहे हा घ्यावा लागेल.

शेवटचा मुद्दा - मुक्तछंदाच्या पुष्ट्यर्थ निबंधात दिलेली उदाहरणे १९५०च्या पूर्वीची आहेत, कारण प्रस्तुत निबंधाचा विषयच मुळी 'छंद-विचार : परंपरा आणि नवता' हा आहे. ओवी-छंदाच्या आरंभाविषयी बोलायचे झाल्यास जशी ज्ञानेश्वरकालीन ओवी उदाहरणादाखल घ्यावी लागेल, तद्वतच मुक्तछंदाच्या इतिहासाची सुरवात या आरंभकालीन मुक्तछंदातील कवितांच्या आधाराने करणे भाग आहे. परंपरेने चालत आलेल्या छंदापासून बदलत मराठी कविता नव्या मुक्तछंदवेषात कशी प्रविष्टली हे सांगताना कालक्रमानुसार छंदबदलाच्या पाऊलखुणा जिच्यात सहज दृग्गोचर होतात अशा कवितांना निबंधात प्राधान्य दिले जाणे स्वाभाविकच नव्हे का? साहजिकच त्या काळातील कविता विवेचनाच्या स्पष्टीकरणासाठी घेतल्या गेल्या.

या चर्चेच्या निमित्ताने या उपेक्षित विषयाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधून घेतल्याबद्दल नीलिमा गुंडी यांना धन्यवाद द्यायला हवेत! ■

### विवेकी देशीवाद = विश्ववाद

राल्फ लिंटननं १९४३मध्ये भूतकाळाचं पुनरुज्जीवन करणारा देशीवाद, वर्तमानाला चिरंतन करणारा देशीवाद, मंत्रतंत्राचा जादुई देशीवाद आणि विवेकवादी देशीवाद असं देशीवादाचं वर्गीकरण केलं होतं. यातले तीन देशीवाद स्थितीसत्ताक देशीवाद असतात. विवेकवादी देशीवाद मात्र गतिसत्ताक असतो. त्याचा विवेक बदल टाळत नसतो. त्याची भूमिका विज्ञाननिष्ठा, बुद्धिवाद आणि इहवाद हीच असते. त्याच्या विश्वाचा आकार, एखाद्या व्यक्तीच्या, एखाद्या देशाच्या वा प्रदेशाच्या डोक्याएवढा असतो.. त्याच्या विश्वाचा आकार संपूर्ण विश्वाएवढा किंवा संपूर्ण मानवी जीवनाएवढा असतो. कोणताही देश ही मर्यादा इथं नसते, तर संपूर्ण अमर्याद विश्व हीच त्याची आस्थाभूमी वा चिंतनभूमी असते आणि या भूमीतील प्रत्येक केंद्र ही त्याची केंद्रभूमी असते. त्यामुळंच मला असं वाटतं, की लिंटननं विवेकवादी, देशीवाद म्हटलं असलं, तरी तो असीम असा विश्ववादच ठरतो.

-यशवंत मनोहर, 'दै० सकाळ', ०७-१२-२०१४

**लेखक-परिचय**

■ **इंगोले,** प्रतिमा : एम०ए०,पीएच०डी० काही वर्षे महाविद्यालयात अध्यापन. आता पूर्ण वेळ लेखन. एकूण ८० पुस्तके प्रसिद्ध : सहा कादंबऱ्या, सहा कथासंग्रह, चार कवितासंग्रह, सहा लोकसाहित्यासंबंधी, बालसाहित्य.

टपाल-पत्ता : वृंदावन गार्डन सोसायटी, इमारत अ, लोकमान्य वसाहत, पौड रस्ता, पुणे 411 038. चलभाष : 09850117969

■ **काटीकर,** आनन्द : एम०ए०, पीएच०डी० (प्रबंधाचा विषय : 'भाषा आणि जीवन : एक अभ्यास'), औषधनिर्माणशास्त्राची पदविका, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे अध्यापन. 'भाषा आणि जीवन'चे एक संपादक . मराठी अभ्यास परिषदेचे चिटणीस.

■ **कुलकर्णी-जोशी,** सोनल : डेक्कन महाविद्यालयामधून एम०ए०,रेडिंग विद्यापीठातून (इंग्लंड) सामाजिक, भाषाविज्ञानात पीएच०डी०. सध्या डेक्कन महाविद्यालयात (पुणे) येथे भाषाविज्ञानाच्या प्रोफेसर व विभागप्रमुख.

टपाल-पत्ता : फ्लॅट क्र०6, 'बी' इमारत, पूर्वा अपा., प्लॉट क्र०30/31, चिंतामणीनगर, पुणे. चलभाष : 98904 44606; ई-पत्ता : sonalkulk@rediffmail.com

■ **कोल्हटकर,** अरविंद : पुणे विद्यापीठातून गणित या विषयात एम०ए० पदवी (१९६४). रशियन भाषेचे प्रमाणपत्र व पदविका प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण (१९६५), आयकर-आयुक्त या पदावरून स्वेच्छानिवृत्ती. बॉम्बे स्टॉक एक्स्चेंजचे चिटणीस म्हणून काही काळ काम. आता टोरांटो (कॅनडा)मध्ये स्थायिक. भारतीय भाषा व संस्कृती या विषयांवर विविध संकेतस्थळांवर प्रसंगोपात्त लेखन. kolhatkar.org हे स्वत:चे संकेतस्थळ.

टपाल-पत्ता : 313-38, एल्म स्ट्रीट, टोरांटो, ऑंटारिओ M5G 2K5, कॅनडा. स्थिरभाष : + 1 416 340 0881; ई-पत्ता : akolhatkar@rogers.com

■ **देवळेकर,** सुशान्त : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. २००२-०८ ह्या काळात भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) (मुंबई) येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवा. मराठी 'शाब्दबंध' हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश व मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी 'रूपविश्लेषक' ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर युनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.

टपाल-पत्ता : D-605, सुबोधनगर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे, नालासोपारा, ता० वसई, जि० ठाणे 401 203, चलभाष : 097698 35310

■ **प्रभुदेसाई,** विद्या **वासुदेव** : एम०ए०, एम०फिल०, पीएच०डी०. पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय, फोंडा येथे मराठीच्या विभाग-प्रमुख. अनेक नियतकालिकांतून संशोधनपर लेख प्रकाशित.

टपाल-पत्ता : पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय, फोंडा, गोवा. चलभाष : 09422061000

■ **भट्ट,** एम०ए० : (जन संज्ञापन) प्रसिद्ध कन्नड कादंबरीकार. 'प्रजावाणी' या कन्नड दैनिकाचे विशेष वार्ताहर. अनेक पारितोषिकांनी सन्मानित.
चलभाष : 094493 70075; ई-पत्ता : ravindrabhat@prajavani.com.in

■ **मापारी,** डिंपल : प्राध्यापक, इंग्रजी विभाग, शंकरलाल खंडेलवाल महाविद्यालय, अकोला.
टपाल-पत्ता : 'सृजन', गोडबोले प्लॉट, डाबकी रस्ता, अकोला 444002.
चलभाष : 098230 41316

■ **मोहिते,** सरोजिनी : एम०ए० (मराठी व संस्कृत),६० नियतकालिकांत लेखन, समाज-मालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर), 'देवदास' व 'परिणीता' (शरच्चंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.
स्थिरभाष : 020 - 2425 1353

■ **यार्दी,** अ०रा० : एम०ए०, पीएच०डी०, गेली २८ वर्षे कर्नाटक महाविद्यालयात प्राध्यापक. अनेक नियतकालिकांतून स्फुटलेखन. 'गौतम बुद्धाची आत्मकथा', 'कालिदासाची आत्मकथा', 'अस्तित्व', 'जिव्हार', 'बापू गांधी यांची गोष्ट' ही अनुवादित पुस्तके. 'जीएंची कथा', 'परिसर यात्रा' हे स्वतंत्रलेखन.
टपाल-पत्ता : प्रमुख, मराठी विभाग, कर्नाटक आर्ट्स कॉलेज, धारवाड 580 001.
चलभाष : 0982900484 / 094491 21730

■ **शिंदे,** नवनाथ अगंदा : एम०ए०,बी०एड०,एम०फिल०, सेट, नेट, बी०जे० कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, कोल्हार (जि० अहमदनगर) येथे साहाय्यक प्राध्यापक.
टपाल-पत्ता : 'विद्याधन', मु०पो० लोणी, ता० परंडा, जि० उस्मानाबाद 413 502.
स्थिरभाष : (02477) 235 022 चलभाष : 098907 77639
ई-पत्ता : nshinde70@gmail.com

■ **सरदेसाय,** माधवी : एम०ए०,एम०फिल०. (भाषा विज्ञान), गोवा विद्यापीठाच्या कोंकणी विभाग प्रमुख. 'जाग' या कोंकणी नियतकालिकाच्या संपादक. 'भाषाभास' (१९९३), 'मंथन' (२०१२) हे दोन लेखसंग्रह प्रकाशित.
चलभाष : 09421157007

■ **सार्वेकर,** कैलास : एम०ए०,पीएच०डी०, नवापूर (जि०नंदुरबार) येथील कला, वाणिज्य महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक व विभागप्रमुख. का०स० वाणी मराठी अध्ययन संस्थेचे (धुळे) मानद संचालक, एम०फिल व पीएच०डी०साठी मार्गदर्शक. 'आमची श्रीवाणी' या नियतकालिकाचे सहसंपादक. 'बालभारती' (इ० पहिली) व 'कथामाला' या पुस्तकांचे संपादक. 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास', 'वेध : तळ्यातल्या साउल्यांचा', 'तहान : स्वरूप आणि समीक्षा' हे ग्रंथ प्रकाशित.
स्थिरभाष : (0257) 2251951 चलभाष : 094215 68959
ई-पत्ता : ksarvekar@gmail.com

# मुखपृष्ठाविषयी

या वर्षीच्या अंकांवर गेल्या साठ वर्षांतील काही महत्त्वाच्या कादंबऱ्यांतील उतारे छापण्याचे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे पहिल्या (हिवाळा,३२:१ जाने०-मार्च२०१४) अंकाच्या मुखपृष्ठावर विभावरी शिरूरकर (मालती बेडेकर) यांच्या 'बळी' (प्रकाशन १९४८) या कादंबरीतील उतारा समाविष्ट करण्यात आला. त्या उताऱ्याबद्दलचे संपादकीय निवेदन त्याच अंकात देण्यात आले.

या वर्षातील दुसऱ्या (उन्हाळा,३२:२ एप्रिल-जून२०१४) अंकावर ह० मो० मराठे यांच्या 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी' या कादंबरीतील (प्रकाशन १९७२)उतारा देण्यात आला. त्यात निवेदकाच्या उद्विग्न मन:स्थितीतून भोवतालच्या परिस्थितीबद्दलचा संताप उपरोधाच्या माध्यमातून व्यक्त झाला आहे. त्याच्या अपेक्षा झुरळाइतक्या क्षुद्र आहेत, पण त्याही पूर्ण होत नाहीत. जणू काही निवेदकच स्वत:ला अवाढव्य भोवतालाच्या अर्थशून्य पसाऱ्यामध्ये झुरळाप्रमाणे क्षुद्र असल्याचे, परिस्थितीच्या चिमटीत चिरडून जात असल्याचे पाहात आहे. निवेदकाच्या मन:स्थितीला पारदर्शकपणे व्यक्त करणारा हा उतारा आहे. भोवतालच्या तपशिलांची यादी देत निवेदक संपूर्ण देशाला कवेत घेतो आणि त्यात जगणाऱ्या उमद्या, आनंदी, निश्चिंत (पण संवेदनशून्य स्त्रीपुरुषांना सामावून घेणाऱ्या सांस्कृतिक ओघाशी पोचतो. यात भाषेचा ओघ कसा वेगवान होत जातो आणि यज्ञमंत्रांच्या विरूपीकरणात तो कवितेच्या जवळ पोचतो. कादंबरीच्या गद्य निवेदनातून कवितेचा परिणाम साधणारी भाषा या उताऱ्यात आपल्याला दिसते.

चालू (पावसाळा,३२:३ जुलै-सप्टेंबर२०१४) अंकावरील मुखपृष्ठावर श्याम मनोहर यांच्या 'हे ईश्वरराव... हे पुरुषोत्तमराव...' या पहिल्याच कादंबरीतील उतारा (प्रकाशन १९८३) घेतला आहे. आपली रोजची नित्य परिचयाची भाषा श्याम मनोहर किती वेगळ्या रीतीने वापरतात हे त्यावरून दिसून येईल. प्रारंभीच्या पाच ओळीत ते 'घाई' हा शब्द सहा वेळा वापरतात (आणि कादंबरीतील पात्रं आणि त्यांची मन:स्थिती यांचे चित्रमय दर्शन घडवितात. 'उद्याच्या आत ह्याच संध्याकाळी', 'गच्चदिशी उसळी', 'अस्थिरला होता' हीही त्यांच्या भाषिक उपयोजनांचे वेगळेपण दर्शवितात.


भाषा
आणि
जीवन
मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३३ । अंक ३ पावसाळा (जुलै) २०१४
विद्वत्प्रमाणित त्रैमासिक (Refereed Journal)
मूल्य ₹ ४०/-
प्रेषक:
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
आनंद काटीकर, बी. 5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता
आनंदनगर, पुणे 411 051 ☎- 09421610704
e-mail: marathi.abhyas.parishad@gmail.com
Book Packet Containing Periodical
बुकपोस्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक
विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
आर. एन. आय. नोंदणी क्र. Q-40048/83,
ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parishad Patrika
• प्रेषक •
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
प्रा. डॉ. आनंद काटीकर - मराठी विभाग
फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे - 411 004
☎ : 09421610704